॥ ॐ श्रीपरमात्मने नमः॥

# अथ पञ्चदशोऽध्यायः

## अवतरणिका

श्रीमद्भगवद्गीतेच्या बाराव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात ''सगुण आणि निर्गुण-उपासकांपैकी कोण श्रेष्ठ आहे?'' या प्रश्नाच्या उत्तरात भगवंतांनी सगुण उपासकांना सर्वश्रेष्ठ योगी सांगितले. पाचव्या श्लोकात सगुण आणि निर्गुण उपासनेची तुलना करीत असताना भगवंतांनी म्हटले की, देहाभिमान्यासाठी अव्यक्त अर्थात् निर्गुण तत्त्वाची उपासना कठीण आहे. ही देहाभिमानीरूपी बाधा कशी नाहिशी करता येईल— या विषयाचे तसेच निर्गुण तत्त्वाचे विवेचन भगवंतांनी तेराव्या आणि चौदाव्या अध्यायामध्ये केले.

चौदाव्या अध्यायाच्या एकवीसाव्या श्लोकात अर्जुनाने गुणातीत पुरुषांची लक्षणे आणि आचरणाबरोबरच गुणातीत होण्याचा उपाय विचारला. याच्या उत्तरात भगवंतांनी बावीसाव्यापासून पंचवीसाव्या श्लोकापर्यंत गुणातीत पुरुषांची लक्षणे आणि आचरणांचे वर्णन करून सव्वीसाव्या श्लोकामध्ये सगुण उपासकांसाठी ''अव्यभिचारी भक्तियोग'' गुणातीत होण्याचा उपाय सांगितला. तात्पर्य भगवंताचा अनन्य भक्त (भगवंतावरच आश्रित आणि भगवंतालाच आपले मानल्यामुळे) सुगमतापूर्वक गुणातीतसुद्धा होतो. या (सव्वीसाव्या) श्लोकात भगवंतांनी ''**अव्यभिचारेण भक्तियोगेन**'' पदांनी व्यभिचारदोषरहित (संसाराचा आश्रय) भक्तियोगाचे, ''यः'' पदाने जीवाचे आणि ''माम्'' पदाने आपले (परमात्म्याचे) सूक्ष्मरूपाने वर्णन केले. म्हणून याच तिन्ही विषयांचा अर्थात् संसार, जीव आणि परमात्मा, यांचे विस्तृत विवेचन भगवान् या (पंधराव्या) अध्यायात करीत आहेत.

जीव स्वरूपाने (परमात्म्याचा अंश असल्याने) गुणातीत असूनही अनादी अज्ञानामुळे गुणांच्या प्रभावाने प्रभावित होऊन गुणांचे कार्य असलेले शरीराशी (संसार) तादात्म्य, ममता आणि कामना करून आबद्ध झाला आहे. जोपर्यंत तो गुणांहून अतीत (विलक्षण) तत्त्व असलेल्या परमात्म्याच्या प्रभावाला जाणून घेत नाही, तोपर्यंत तो प्रकृतिजन्य गुणांच्या प्रभावापासून संपूर्णपणे मुक्त होऊ शकत नाही. म्हणून भगवान् (आपल्या प्राप्तीचे आवडते साधन ''अव्यभिचारिणी भक्ती'' प्राप्त करविण्याच्या हेतूने) आपला अत्यंत गोपनीय आणि विशेष प्रभाव दाखविण्यासाठी या (पंधराव्या) अध्यायाचा आरंभ करतात.

जीव परमात्म्याचा अंश आहे (१५।७). म्हणून याचा एकमात्र संबंध आपल्या अंशी परमात्म्याशीच आहे. परंतु अज्ञानाने हा आपला संबंध प्रकृतीचे कार्य शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीशी मानतो, ज्यांच्याशी त्याचा संबंध वास्तविक कधी नव्हता, नाही, होणार नाही आणि होऊही शकत नाही. परमात्म्याशी असलेल्या आपल्या वास्तविक संबंधाला विसरून शरीरादी विजातीय पदार्थांना ''मी'', ''माझे'' आणि ''माझ्यासाठी'' मानणे हाच व्यभिचारदोष आहे. हा व्यभिचारदोषच अनन्य भक्तियोगात मुख्य बाधक आहे. ही बाधा नाहीशी करण्यासाठी पंधराव्या अध्यायाच्या पहिल्या पाच श्लोकांच्या प्रकरणात भगवान् संसार-वृक्षाचे वर्णन करून त्याचे छेदन करण्याविषयी आज्ञा करतात.

*श्रीभगवानुवाच*

**ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम्।**
**छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित्॥ १॥***

---

* ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थः सनातनः।
तदेव शुक्रं तद् ब्रह्म तदेवामृतमुच्यते॥
तस्मिँल्लोकाः श्रिताः सर्वे तदु नात्येति कश्चन। एतद्वैतत्॥ (कठोपनिषद् २।३।१)

श्रीभगवान् म्हणाले—

| | |
|---|---|
| **ऊर्ध्वमूलम्** | = वर मूळे असलेल्या (तसेच) |
| **अध:शाखम्** | = खाली शाखा असलेल्या |
| **अश्वत्थम्** | = (ज्या) संसाररूपी अश्वत्थ वृक्षाला |
| **अव्ययम्** | = (प्रवाहरूपाने) अव्यय |
| **प्राहु:** | = म्हणतात (आणि) |
| **छन्दांसि** | = वेद |
| **यस्य** | = ज्याची |
| **पर्णानि** | = पाने आहेत, |
| **तम्** | = त्या संसारवृक्षाला |
| **य:** | = जो |
| **वेद** | = जाणतो, |
| **स:** | = तो |
| **वेदवित्** | = संपूर्ण वेदाला जाणणारा आहे. |

***व्याख्या*— ऊर्ध्वमूलमध:शाखम्—**[तेराव्या अध्यायाच्या आरंभाच्या दोन श्लोकाप्रमाणे येथे पंधराव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकातही भगवंतांनी अध्यायाच्या संपूर्ण विषयाचे दिग्दर्शन करविले आहे आणि "**ऊर्ध्वमूलम्**" पदाने परमात्म्याचे, "**अध:शाखम्**" पदाने संपूर्ण जीवाचे असलेले प्रतिनिधी ब्रह्मदेवाचे, तसेच "**अश्वत्थम्**" पदाने संसाराचा संकेत करून (संसाररूपी अश्वत्थवृक्षाचे मूळ) सर्वशक्तिमान् परमात्म्याला यथार्थरूपाने जाणून घेणाऱ्याला "**वेदवित्**" म्हटले आहे.]

सर्वसाधारण वृक्षाचे मूळ खाली असते आणि शाखा वरच्या बाजूला असतात. परंतु हा संसारवृक्ष असा विचित्र वृक्ष आहे की, याचे मूळ वर आणि शाखा खाली आहेत.

जेथे गेल्यानंतर मनुष्य संसारात परत येत नाही, असे भगवंताचे परमधाम हेच संपूर्ण भौतिक संसाराहून वर (सर्वोपरी) आहे. संसारवृक्षाची मुख्य शाखा (कंधा) ब्रह्मदेव आहेत, कारण संसारवृक्षाच्या उत्पत्तीच्या वेळी सर्वात प्रथम ब्रह्मदेवाचा उद्भव होतो, म्हणूनच ब्रह्मदेव याची मुख्य शाखा आहेत. ब्रह्मलोक भगवद्धामापेक्षा खाली आहे. स्थान, गुण, पद, आयू इत्यादी सर्वच दृष्टींनी परमधामापेक्षा निम्न श्रेणीत असल्यामुळेच त्यांना "अध:" (खाली) म्हटले आहे.*

हा संसाररूपी वृक्ष वर मूळे असलेला आहे. वृक्षात मूळच मुख्य असते. तसेच या संसाररूपी वृक्षामध्ये परमात्माच प्रधान आहेत. त्यांच्यापासून ब्रह्मदेव प्रगट होतात, ज्याचे वर्णन "**अध:शाखम्**" पदाने झाले आहे.

सर्वांचे मूळ प्रकाशक आणि आश्रय परमात्माच आहेत. देश, काळ, भाव, सिद्धांत, गुण, रूप, विद्या इत्यादी सर्व दृष्टींनी परमात्माच सर्वात श्रेष्ठ आहेत. त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ तर काय, पण त्यांच्या समान देखील दुसरा कोणी नाही† (११।४३), संसारवृक्षाचे मूळ सर्वोपरी परमात्मा आहेत. जसे "मूळ" वृक्षाचा आधार असते, तसेच परमात्मा संपूर्ण जगताचे आधार आहेत, म्हणूनच त्या वृक्षाला "**ऊर्ध्व मूलम्**" म्हटले गेले आहे.

"मूळ" शब्द कारण वाचक आहे. या संसारवृक्षाची उत्पत्ती आणि याचा विस्तार परमात्म्यापासूनच झाला आहे. ते परमात्मा नित्य, अनंत आणि सर्वांचे आधार आहेत. तसेच सगुणरूपाने सर्वात वर नित्यधामात निवास करतात. म्हणून ते "ऊर्ध्व" नावाने म्हटले जातात. हा संसारवृक्ष त्याच परमात्म्यापासून उत्पन्न झाला आहे. म्हणून याला वर मूळे असलेला (ऊर्ध्वमूल) म्हणतात.

वृक्षाच्या मूळापासूनच बुंधा, शाखा, कोंब निघतात. त्याचप्रमाणे परमात्म्यापासूनच संपूर्ण जगत् उत्पन्न होत असते, त्यांच्यापासूनच विस्तृत होते आणि त्यांच्यातच स्थित राहत असते. त्यांच्यापासूनच शक्ती प्राप्त करून संपूर्ण जगत् क्रियान्वित होते.‡ अशा सर्वोपरी परमात्म्याला शरण जाण्याने मनुष्य नेहमीकरीता कृतार्थ होतो. (शरण होण्याचा विषय पुढे चौथ्या श्लोकात "**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये**" पदांमध्ये सांगितला जाणार आहे)

सृष्टिरचनेसाठी ब्रह्मदेव प्रकृतीचा स्वीकार करतात. परंतु वास्तविक ते (प्रकृतीशी संबंधरहित असल्यामुळे) मुक्त आहेत. ब्रह्मदेवाशिवाय दुसरे संपूर्ण जीव प्रकृती आणि तिचे कार्य शरीरादीशी अहंता-ममतापूर्वक जितका जितका आपला संबंध समजतात, तितके-तितकेच ते बंधनात पडलेले आहेत आणि त्यांचे वारंवार पतन (जन्म-मरण) होत राहते, अर्थात् तितक्याच शाखा खाली पसरत राहतात. सात्त्विक, राजस आणि तामस या तिन्ही गती "**अध: शाखम्**" च्याच अंतर्गत येतात. (१४।१८)

**अश्वत्थम्—**या शब्दाचे दोन अर्थ आहेत (१) जो उद्या पर्यंतही राहू शकत नाही卐 आणि (२) पिंपळाचा वृक्ष.

---

* येथे "अध: शाखम्" पदात ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत सर्व जीवांचा समावेश आहे.

† "**न तत्समश्चाभ्यधिकश्च दृश्यते**" (**श्वेताश्वतरोपनिषद्** ६।८) त्या (परमात्मा) पेक्षा मोठा आणि त्याच्यासारखाही दुसरा (कोणी) दिसत नाही.

‡ जसे गीतेमध्ये म्हटले आहे—"अहं कृत्स्नस्य जगत: प्रभव: प्रलयस्तथा" (७।६), "प्रभव: प्रलय: स्थानं निधानं बीजमव्ययम्" (९।१८), अहं सर्वस्य प्रभवो मत्त: सर्वं प्रवर्तते (१०।८), "यत: प्रवृत्ति: प्रसृता पुराणी" (१५।४) आणि "यत: प्रवृत्तिर्भूतानाम्" (१८।४६)

卐 "श्व:" पर्यन्तं न तिष्ठतीति अश्वत्थ:" "श्वस्" अव्यय येणाऱ्या उद्याचा वाचक आहे. जो उद्यापर्यंत स्थिर राहतो त्याला "श्वत्थ" तसेच तो उद्यापर्यंतही स्थिर राहत नाही त्याला "अश्वत्थ" म्हणतात.

पहिल्या अर्थानुसार "**अश्वत्थ**" पदाचे तात्पर्य संसार एक क्षणही* स्थिर राहणारा नाही. केवळ परिवर्तनाच्या समूहाचे नावच संसार आहे. परिवर्तनाचे जे नवे रूप समोर येते त्याला उत्पत्ती म्हणतात. थोडे आणखी परिवर्तन झाल्यास त्याला स्थितीरूपाने मानतात आणि जेव्हा स्थितीचेही स्वरूप परिवर्तन होते तेव्हा त्याला समाप्ती (प्रलय) म्हणतात. वास्तविक याची उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय होतच नाही. यात प्रत्येक क्षणाला परिवर्तन होत असल्यामुळे हा (संसार) एक क्षणही स्थिर नसतो. दृश्यमात्र प्रतिक्षण अदर्शनात जात आहे. याच भावनेने या संसाराला "**अश्वत्थम्**" म्हटले गेले आहे.

दुसऱ्या अर्थानुसार—हा संसार पिंपळाचा वृक्ष आहे. शास्त्रात अश्वत्थ अर्थात् पिंपळाच्या वृक्षाचे फार माहात्म्य वर्णन केले गेले आहे. स्वतः भगवान्‌ही सर्व वृक्षांमध्ये "अश्वत्थ" यास आपली विभूती म्हणून श्रेष्ठ आणि पूज्य सांगतात—"**अश्वत्थः सर्ववृक्षाणाम्**" (१०।२६). पिंपळ, आवळी आणि तुळस यांची भगवद्भावनेने पूजा केल्यास ती भगवंताची पूजा होते.

परमात्म्यापासून संसार उत्पन्न होतो. तेच संसाराचे अभिन्ननिमित्तोपादान कारण आहेत. म्हणून संसाररूपी पिंपळाचा वृक्षही तत्त्वतः परमात्मस्वरूप असल्याने पूजनीय आहे. या संसाररूपी पिंपळ वृक्षाची पूजा हीच आहे की, यापासून सुख घेण्याच्या इच्छेचा त्याग करून केवळ याची सेवा करणे. सुखाची इच्छा न ठेवणाऱ्यासाठी हा संसार साक्षात् भगवत्स्वरूप आहे—"**वासुदेवः सर्वम्**" (७।१९). परंतु संसारापासून सुखाची इच्छा ठेवणाऱ्यासाठी हा संसार दुःखांचे घरच आहे. कारण स्व अविनाशी आहे आणि हा संसारवृक्ष प्रतिक्षण परिवर्तनशील असल्यामुळे नाशवान, अनित्य आणि क्षणभंगुर आहे. म्हणून स्व ची तृप्ती याच्याकडून कधीच होऊ शकत नाही. परंतु याच्याकडून सुखाची इच्छा करून हा वारंवार जन्मत-मरत राहतो. म्हणून संसाराशी यत्किंचित्‌ही स्वार्थाचा संबंध न ठेवता केवळ त्याची सेवा करण्याचाच भाव ठेवला पाहिजे.

**प्राहुरव्ययम्**—संसारवृक्षाला अव्यय म्हटले जाते. क्षणभंगुर, अनित्य असलेल्या संसाराचा आदी आणि अंत न जाणू शकल्यामुळे, प्रवाहाच्या निरंतरतेमुळे (नित्यते) तसेच याचे मूळ सर्वशक्तिमान् परमेश्वर नित्य, अविनाशी असल्या-कारणानेच याला अव्यय म्हणतात. ज्याप्रमाणे समुद्राचे पाणी सूर्याच्या उष्णतेने वाफ बनून ढग बनते. मग आकाशात थंडी प्राप्त होताच तेच पाणी ढगामधून पुन्हा पाणीरूपाने पृथ्वीवर येते. मग तेच पाणी नदी, नाल्याचे रूप धारण करून समुद्रात जाते. पुन्हा समुद्राचे पाणी ढग बनून वर्षते. अशा सतत फिरणाऱ्या जल-चक्राचा कधी अंत लागत नाही. त्याचप्रमाणे या संसार-चक्राचाही कधी अंत लागत नाही. हे संसार-चक्र इतक्या वेगाने फिरत (बदलत) असते की, चित्रपटा (सिनेमा) प्रमाणे अस्थिर (प्रत्येक क्षणाला बदलणारे) असूनही स्थिरासारखे प्रतीत होते.

हा संसारवृक्ष अव्यय म्हटला जातो (**प्राहुः**). वास्तविक हा अव्यय (अविनाशी) नाहीच. जर हा अव्यय असता तर याच अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात असे म्हटले नसते की, या (संसार) चे जसे स्वरूप म्हटले जाते, तसे ते उपलब्ध होत नाही आणि या (संसारवृक्षा) ला वैराग्यरूपी दृढ शस्त्राने छेदन करण्याची प्रेरणा भगवंतांनी केली नसती.

**छन्दांसि यस्य पर्णानि**—वेद या संसारवृक्षाची पाने आहेत. येथे वेदाचे तात्पर्य वेदाच्या त्या अंशाशी आहे ज्या-मध्ये सकामकर्मांच्या अनुष्ठानांचे वर्णन आले आहे.† तात्पर्य ज्या वृक्षाला पाने, फूले तर छान आहेत पण फळच येत नसेल तर तो वृक्ष निरुपयोगी आहे. कारण वास्तविक तृप्ती तर फळानेच होत असते, पाना, फुलांच्या शोभेने नव्हे. त्याचप्रमाणे सुखभोगाची इच्छा ठेवणाऱ्या सकाम पुरुषाला भोगैश्वर्यरूपी पाना-फुलांनी संपन्न असा हा संसारवृक्ष बाहेरुन तर फार सुंदर प्रतीत होतो, परंतु यापासून सुखाची इच्छा ठेवल्यामुळे, त्याला अक्षय सुखरूपी तृप्ती अर्थात् महान् आनंदाची प्राप्ती होत नाही.

वेदविहित पुण्यकर्मांचे अनुष्ठान स्वर्गादी लोकांच्या कामनेने केले तर ते निषिद्ध कर्म करण्यापेक्षा श्रेष्ठ तर आहे, परंतु त्या कर्मांनी मुक्ती मिळू शकत नाही, कारण फलभोगानंतर पुण्यकर्म समाप्त होते आणि त्याला पुनः संसारात यावे लागते (९।२१). अशा रीतीने सकाम कर्म आणि त्याचे फल—दोन्हीही उत्पन्न आणि नष्ट होणारे आहेत. म्हणून साधकाने या (दोन्ही) पासून संपूर्णपणे असंग होऊन एकमात्र परमात्मतत्त्वच प्राप्त करून घेतले पाहिजे.

* "क्षण" याचे विवेचन दार्शनिकांनी अशा प्रकारे केले आहे—कमळाच्या पानावर सुई टोचली तर ती पानाच्या दुसऱ्या बाजूने बाहेर येण्यात तीन क्षण लागतात. पहिल्या क्षणात स्पर्श, दुसऱ्या क्षणात छेदन आणि तीसऱ्या क्षणात आरपार निघणे.

† वेदांमध्ये सकाम मंत्रांची संख्या तर ऐंशी हजार आहे परंतु मुक्त करणाऱ्या मंत्रांची संख्या वीस हजारच आहे. ज्यापैकी चार हजार मंत्र ज्ञानकांडाचे आणि सोळा हजार मंत्र उपासना कांडाचे आहेत.

पाने झाडाच्या फांदीपासून उत्पन्न होणारी आणि झाडाची वृद्धी व रक्षण करणारी असतात. पानांमुळे वृक्ष सुंदर दिसतो व पक्का होतो. (पाने हलण्याने झाडाचे मूळ, बुंधा, आणि शाखा दृढ होतात). वेदसुद्धा या संसार-वृक्षाच्या मुख्य शाखारूपी ब्रह्मदेवापासून प्रकट झाले आहेत आणि वेदविहित कर्मांनीच संसाराची वृद्धी आणि रक्षण होत असते. म्हणून वेदांना पानांचे स्थान दिले गेले आहे. संसारात सकाम (काम्य) कर्मांनी स्वर्गात देवयोनी प्राप्त होतात, हे संसारवृक्षाचे वाढणे आहे. स्वर्गादीत नंदनवन, सुंदर विमान, रमणीय अप्सरा, इत्यादी आहेत, ही संसार वृक्षाच्या सौंदर्याची प्रतीती आहे. सकाम कर्म करीत राहिल्याने वारंवार जन्म-मरण होत राहते, हे संसारवृक्षाचे दृढ होणे आहे.

या पदाने भगवान् हे सांगू इच्छितात की, साधकाने सकामभाव, वैदिक सकाम-कर्मानुष्ठानरूपी पानामध्ये न फसता संसारवृक्षाच्या मूळाचा-परमात्म्याचा आश्रय घ्यावा. परमात्म्याचा आश्रय घेतल्याने वेदांचे वास्तविक तत्त्वही जाणण्यात येते. वेदांचे वास्तविक तत्त्व संसार अथवा स्वर्ग नाही तर परमात्माच आहे (१५। १५)*

**यस्तं वेद स वेदवित्**—त्या संसारवृक्षाला जो मनुष्य जाणतो, तो संपूर्ण वेदांच्या यथार्थ तात्पर्याला जाणणारा आहे. संसाराला क्षणभंगुर (अनित्य) जाणून, यापासून कधी किंचिन्मात्रही सुखाची आशा न ठेवणे—हेच संसाराला यथार्थरूपाने जाणणे आहे. वास्तविक संसाराला क्षणभंगुर जाणून घेतल्यावर सुखभोग होऊच शकत नाही. सुखभोगाच्या वेळी संसार क्षणभंगुर दिसत नाही. जोपर्यंत संसाराच्या प्राणी पदार्थांना स्थायी मानले जाते, तोपर्यंत सुखभोग, सुखाची आशा आणि कामना, तसेच संसाराचा आश्रय, महत्त्व, विश्वास कायम राहतो. संसार प्रत्येक क्षणाला नष्ट होत आहे असा ज्यावेळी अनुभव येतो त्याच वेळी त्याच्यापासून सुख घेण्याची इच्छा समाप्त होते आणि साधक त्याच्या वास्तविक स्वरूपाला जाणून घेऊन (संसाराशी विमुख आणि परमात्म्याशी सम्मुख होऊन) परमात्म्याशी आपल्या अभिन्नतेचा अनुभव करून घेतो. परमात्म्याशी अभिन्नतेचा अनुभव होण्यातच वेदांचे वास्तविक तात्पर्य आहे. जो मनुष्य संसाराशी विमुख होऊन परमात्मतत्त्वाशी आपल्या अभिन्नतेचा (जो वास्तविक आहे) अनुभव करून घेतो, तोच वास्तविक "**वेदवित्**" आहे. वेदांच्या केवळ अध्ययनाने मनुष्य वेदांचा विद्वान तर होऊ शकतो, परंतु यथार्थ वेदवेत्ता नव्हे. वेदांचे अध्ययन न होता देखील ज्याला (संसाराशी संबंध-विच्छेदपूर्वक) परमात्मतत्त्वाची अनुभूती झाली आहे, तोच वास्तविक वेदवेत्ता (वेदांचे तात्पर्य अनुभवात आणणारा) आहे.

भगवंतांनी याच अध्यायाच्या पंधराव्या श्लोकात स्वत:ला "वेदवित्" म्हटले आहे. येथे ते संसाराच्या तत्त्वाला जाणणाऱ्या पुरुषाला "वेदवित्" म्हणून त्याच्याशी आपली एकता प्रगट करतात. तात्पर्य, मनुष्यशरीरात मिळालेल्या विवेकाचा इतका महिमा थोर आहे की, त्याच्या साहाय्याने जीव संसाराच्या यथार्थ तत्त्वाला जाणून भगवंतासारखा वेदवेत्ता होऊ शकतो.†

परमात्म्याचाच अंश असल्यामुळे जीवाचा एकमात्र वास्तविक संबंध परमात्म्याशी आहे. संसाराशी तर याने अज्ञानाने आपला संबंध मानला आहे, वास्तविक संबंध नाहीच. विवेकद्वारा हे अज्ञान नाहीसे करून अर्थात् संसाराशी मानलेल्या संबंधाचा त्याग करून एकमात्र आपल्या अंशी परमात्म्याशी असलेल्या आपल्या स्वत:सिद्ध अभिन्नतेचा अनुभव करणाराच, संसारवृक्षाच्या यथार्थ तत्त्वाला जाणणारा आहे आणि त्यालाच भगवान् येथे "वेदवित्" म्हणत आहेत.

**परिशिष्ट भाव**—जगत, जीव आणि परमात्मा—तिन्ही वासुदेवस्वरूपच आहेत—**'वासुदेवः सर्वम्'**. याचेच येथे वृक्षरूपाने वर्णन केले गेले आहे.

परिवर्तनशील असूनही संसाराला 'अव्यय' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, संसारात निरंतर परिवर्तन होत असूनही काही व्यय (खर्च) होत नाही अर्थात् अंत होत नाही. जसे समुद्रावर किती तरी लाटा निर्माण झालेल्या दिसतात, ज्वार-भाटा येतो, परंतु त्याचे पाणी तेवढेच राहते, कमी-जास्त होत नाही. तसेच निरंतर परिवर्तन होत असलेले दिसूनही संसार अव्ययच राहतो. कारण परिवर्तनरूपी संसारसुद्धा परमात्म्याच्या शक्तीचे 'अपरा प्रकृती' चे कार्य असल्यामुळे परमात्म्याचेच स्वरूप आहे—**'सदसच्चाहमर्जुन'** (गीता ९। १९). परिवर्तनरूपी अपरा प्रकृतीसुद्धा परमात्म्याचे स्वरूप आहे आणि अपरिवर्तनरूपी परा-प्रकृतीसुद्धा परमात्म्याचे स्वरूप आहे. हा संसार त्या परमात्म्याच्याच लाटा आहेत. जसे वर-वर लाटा दिसत असूनही समुद्राच्या आत कोणतीही लाट नाही, एक सम, शांत समुद्र आहे, तसेच वर-वर परिवर्तनशील संसार दिसत असूनही आतून

* "सर्वे वेदा यत् पदमामनन्ति" (कठोपनिषद् १। २। १५) "संपूर्ण वेद ज्या परमपद परमात्म्याचे वारंवार प्रतिपादन करतात."

† "मम साधर्म्यमागता:" (१४। २) मध्ये हीच गोष्ट सांगितली गेली आहे.

एक सम, शांत परमात्मा आहे. (गीता—तेराव्या अध्यायाचा सत्तावीसावा श्लोक). तात्पर्य हे आहे की, संसार संसाररूपाने अव्यय नाही, तर भगवद्‌रूपाने अव्यय आहे. संसाररूपाने भगवंताचीच झलक दिसते. साधकाची दृष्टी त्या झलककडे न राहता भगवंताकडेच राहिली पाहिजे. झलककडे दृष्टी राहणे अर्थात् त्याला स्वतंत्र सत्ता आणि महत्ता देऊन त्याच्याशी संबंध जोडणे हेच बंधन आहे.

संसाराला 'अव्यय' म्हणण्याचा दुसरा आशय असाही आहे की, जो या संसाराशी संबंध जोडेल त्याचा तो संबंध अर्थात् जन्म-मरणही अव्यय होईल, कधी मिटणार नाही, त्याचा कधी अंत होणार नाही. लांब रस्त्याचा तर शेवट येऊ शकतो, परंतु गोल रस्त्याला शेवट कुठला असणार? घाण्याच्या बैलासारखे जन्मल्यानंतर मरणे आणि मेल्यानंतर जन्मणे—हा गोलरस्ता आहे.

संसार 'अव्यय' आहे, कारण संसाराचे बीजही 'अव्यय' आहे—'**बीजमव्ययम्**' (गीता ९। १८).

***संबंध***—*पूर्व श्लोकात भगवंतांनी ज्या संसारवृक्षाचे दिग्दर्शन करविले, त्याच संसारवृक्षाचे आता पुढील श्लोकात अवयवा-सहित विस्ताराने वर्णन करीत आहेत.*

## अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः।
## अधश्च मूलान्यनुसन्ततानि कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके॥ २॥

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **तस्य** | = | त्या संसार-वृक्षाच्या | | | असलेल्या | **कर्मानुबन्धीनि** | = | कर्मानुसार बांधणारे |
| **गुणप्रवृद्धाः** | = | गुणांच्या द्वारा (सत्त्व, रज आणि तम यांच्याद्वारा) वाढलेल्या (तसेच) | **शाखाः** | = | शाखा | **मूलानि** | = | मूळ (देखील) |
| | | | **अधः** | = | खाली | **अधः** | = | खाली |
| | | | **च** | = | (मध्यात) आणि | **च** | = | आणि (वर) |
| | | | **ऊर्ध्वम्** | = | वर (सर्व ठिकाणी) | **अनुसन्ततानि** | = | सर्वच लोकांत व्याप्त होत आहे. |
| | | | **प्रसृताः** | = | पसरलेल्या आहेत. | | | |
| **विषयप्रवालाः** | = | विषयरूपी अंकुर | **मनुष्यलोके** | = | मनुष्यलोकात | | | |

***व्याख्या*— तस्य शाखा गुणप्रवृद्धाः**—संसारवृक्षाची मुख्य शाखा ब्रह्मदेव आहेत. ब्रह्मदेवापासून संपूर्ण देव, मनुष्य, तिर्यक् इत्यादी योनींची उत्पत्ती आणि विस्तार झाला आहे. म्हणून ब्रह्मलोकापासून पाताळापर्यंत जितके काही लोक आहेत तसेच तेथे राहणारे देव, मनुष्य, कीट इत्यादी प्राणी आहेत, त्या सर्व संसारवृक्षाच्या शाखा आहेत. ज्याप्रमाणे पाणी दिल्याने झाडाच्या फांद्या वाढतात, त्याप्रमाणे गुणरूपी पाण्याच्या संगाने या संसारवृक्षाच्या शाखा वाढतात. म्हणूनच भगवंतांनी जीवात्म्याचे उच्च, मध्यम आणि कनिष्ठ योनीत जन्म घेण्याचे कारण गुणांचा संगच दाखविले आहे (१३। २१,१४। १८). संपूर्ण सृष्टीत असा कोणता देश, वस्तू, व्यक्ती नाही, जी प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या तिन्ही गुणांनी रहित आहे. (१८। ४०). म्हणून गुणांच्या संबंधानेच संसाराची स्थिती आहे. गुणांची अनुभूती ही गुणांपासून उत्पन्न होणाऱ्या वृत्तीं तसेच पदार्थांद्वारा होत असते. म्हणून वृत्ती तसेच पदार्थ यांच्याशी मानलेल्या संबंधाचा त्याग करविण्यासाठीच "**गुणप्रवृद्धाः**" पद देऊन भगवंतांनी हे सांगितले आहे की, जोपर्यंत गुणांशी किंचिन्मात्रही संबंध आहे, तोपर्यंत संसारवृक्षाच्या शाखा वाढतच राहतील. म्हणून संसारवृक्षाचे छेदन करण्यासाठी गुणांचा संग किंचिन्मात्रही ठेवू नये, कारण गुणांचा संग असताना संसाराशी संबंध-विच्छेद होऊ शकत नाही.

**विषयप्रवालाः**—ज्याप्रमाणे शाखेपासून निघणाऱ्या नव्या कोमल पानाच्या देठापासून पानाच्या टोकापर्यंतच्या भागास प्रवाळ (कोंब) म्हटले जाते, त्याचप्रमाणे गुणांच्या वृत्तींपासून सर्व दृश्य पदार्थांना येथे "**विषयप्रवालाः**" म्हटले गेले आहे.

वृक्षाच्या मुळापासून बुंधा (मुख्य शाखा) बुंध्यापासून शाखा आणि शाखेपासून कोंब निघतात आणि कोंबाने शाखा वाढत जातात. या संसारवृक्षात विषयचिंतनच कोंब आहेत. विषयचिंतन तिन्ही गुणांनी होत असते. ज्याप्रमाणे गुणरूपी पाण्याने संसारवृक्षाच्या शाखा वाढतात त्याचप्रमाणे गुणरूपी जलाने विषयरूपी कोंबही वाढतात. ज्यावेळी कोंब दिसतात, त्यावेळी त्यात व्याप्त असलेले पाणी दिसत नाही, त्याचप्रमाणे शब्दादी विषय तर दिसतात, पण त्यात असलेले गुण दिसत नाहीत. म्हणून विषयानेच गुण जाणले जातात.

"**विषयप्रवालाः**" या पदाचा भाव असा प्रतीत होतो की, विषयचिंतन करीत असेल तर मनुष्याचा संसाराशी

* सेवत बिषय बिबर्ध जिमि नित नित नूतन मार॥ (मानस ६। ९२)

संबंध-विच्छेद होऊ शकत नाही.* (२।६२-६३). अंतकाळी मनुष्य ज्या ज्या भावाने चिंतन करीत शरीराचा त्याग करतो, त्या त्या भावालाच प्राप्त होतो. (८।६) हेच विषयरूपी कोंबाचे निघणे आहे.

कोंबासारखे विषयसुद्धा दिसण्यात फार सुंदर प्रतीत होतात, त्यामुळे मनुष्य त्यांच्याकडे आकर्षित होतो. साधक आपल्या **विवेका**ने परिणामांचा विचार करून, यांना क्षण-भंगुर, नाशवान् आणि दुःखरूप जाणून, या विषयांचा सुगमतापूर्वक त्याग करू शकतो. (५।२२) विषयात सौंदर्य आणि आकर्षण आपल्या आसक्तीमुळेच दिसत असते, वास्तविक ते सुंदर आणि आकर्षक नाहीतच. म्हणून 'विषया' विषयीच्या आसक्तीचा त्यागच वास्तविक त्याग आहे. जसे कोमळ कोंबांना नष्ट करण्यात कोणताही परिश्रम करावा लागत नाही, त्याचप्रमाणे या विषयांचा त्याग करणे साधकाने कठीण समजू नये. मनाने आदर दिल्यामुळेच हे विषयरूपी कोंब सुंदर आणि आकर्षक दिसतात, वास्तविक तर हे विषाच्या लाडूप्रमाणे आहेत.* म्हणून या संसारवृक्षाचे छेदन करण्यासाठी भोगबुद्धिपूर्वक विषयचिंतन तसेच विषयसेवनाचा संपूर्णपणे त्याग करणे आवश्यक आहे.†

**अधश्चोर्ध्वं प्रसृताः**—येथे ''च'' पदाला मध्यलोक अर्थात् मनुष्यलोकाचा (याच श्लोकाच्या ''**मनुष्यलोके कर्मानुबन्धीनि**'' पदांचा) वाचक समजावे-''उर्ध्वम्'' पदाचे तात्पर्य ब्रह्मलोक इत्यादीशी आहे. यात जाण्याचे दोन मार्ग आहेत—देवयान आणि पितृयान (ज्याचे वर्णन आठव्या अध्यायाच्या चोवीसाव्या पंचवीसाव्या श्लोकात शुक्ल आणि कृष्ण मार्गाच्या नावाने झाले आहे). ''अधः'' पदाचे तात्पर्य नरकाशी आहे, ज्याचेही दोन प्रकार आहेत—योनिविशेष नरक आणि स्थानविशेष नरक.

या पदांनी हे म्हटले गेले आहे की, ऊर्ध्वमूल परमात्म्यापासून खाली; संसारवृक्षाच्या शाखा ह्या खाली, मध्ये आणि वर सर्वत्र पसरलेल्या आहेत. यात मनुष्ययोनिरूपी शाखाच मूळ शाखा आहे, कारण मनुष्ययोनीत नवीन कर्म करण्याचा अधिकार आहे. इतर शाखा भोगयोनी आहेत, ज्यात केवळ पूर्वकृत कर्मांचे फल भोगण्याचाच अधिकार आहे. या मनुष्ययोनिरूपी मूळ शाखेपासून मनुष्य खाली (अधोलोक) तसेच वर (ऊर्ध्वलोक), दोन्हीकडे जाऊ शकतो आणि संसारवृक्षाचे छेदन करून सर्वात ऊर्ध्व (परमात्मा) पर्यंतही जाऊ शकतो. मनुष्यशरीरात असा विवेक आहे, ज्याला महत्त्व देऊन जीव परमधामापर्यंत जाऊ शकतो आणि अविवेकपूर्वक विषयांचे सेवन करून नरकातही जाऊ शकतो. म्हणून गोस्वामी तुलसीदासजी यांनी म्हटले आहे—''नरक स्वर्ग अपबर्ग निसेनी। ग्यान बिराग भगति सुभ देनी''॥ (मानस ७।१२१।५)

**अधश्च मूलान्यनुसन्ततानि कर्मानुबन्धीनि मनुष्य-लोके**—मनुष्याव्यतिरिक्त दुसऱ्या सर्व भोगयोनी आहेत. मनुष्ययोनीत केलेल्या पाप-पुण्याचे फल भोगण्यासाठीच मनुष्याला दुसऱ्या योनीत जावे लागते. नवीन पाप-पुण्य करण्याचा अथवा पाप-पुण्यरहित होऊन मुक्त होण्याचा अधिकार आणि अवसर मनुष्यशरीरातच आहे.

येथे ''**मूलानि**'' पदाचे तात्पर्य तादात्म्य, ममता आणि कामनारूपी मूळाशी आहे, वास्तविक उर्ध्वमूल परमात्म्याशी नव्हे. ''मी शरीर आहे''—असे मानणे ''तादात्म्य'' आहे. शरीरादी पदार्थांना आपले मानणे ''ममता'' आहे. पुत्रेषणा, वित्तेषणा आणि लोकेषणा—ह्या तीन प्रकारच्या मुख्य कामना आहेत. पुत्र-परिवाराची कामना ''पुत्रेषणा'' आणि धन-संपत्तीची कामना ''वित्तेषणा'' आहे. संसारात ''माझा मान-सन्मान व्हावा'', ''मी कायम रहावे'', ''शरीर निरोगी असावे'', ''मी शास्त्रांचा पंडित व्हावे'' इत्यादी अनेक कामना ''लोकेषणा'' च्या अंतर्गत येतात. एवढेच नव्हे, तर कीर्तीची कामना मृत्यूनंतरही या रूपात राहते की, लोकांनी माझी प्रशंसा करीत रहावी, माझे स्मारक उभारले जावे, माझ्या स्मृतीसाठी माझी पुस्तके छापली जावीत, लोकांनी माझे स्मरण करावे इत्यादी. जरी कामना बहुतेक सर्व योनीत कमी जास्त रूपाने राहतात, तरीपण त्या मनुष्ययोनीतच बांधणाऱ्या होतात.‡ कामनांनी

---

* दोषेण तीव्रो विषयः कृष्णसर्पविषादपि।
विषं निहन्ति भोक्तारं द्रष्टारं चक्षुषाप्ययम्॥ (विवेक चूडामणि ७९)

दोषांत विषय काळ्या सर्पाच्या विषापेक्षाही अधिक तीव्र आहेत, कारण विष तर खाणाऱ्यालाच मारते, परंतु विषय तर डोळ्यांनी पाहणाऱ्यालाही सोडत नाहीत.

† मोक्षस्य काङ्क्षा यदि वै तवास्ति त्यजातिदूराद्विषयान् विषं यथा। (विवेक चूडामणि ८४)

जर तुला मोक्षाची इच्छा आहे तर विषयाचा विषासारखा दुरूनच त्याग कर.

‡ पुढील तीन इच्छा (बंधनकारक नसल्यामुळे) ''कामना'' म्हटल्या जात नाहीत. (१) भगवद्दर्शन अथवा भगवत्प्रेमाची कामना (२) स्वरूपबोधाची कामना आणि (३) सेवा करण्याची कामना. स्वरूपबोध अथवा परमात्म्याची (भगवद्दर्शन अथवा भगवत्प्रेम) इच्छा ''कामना'' नाही, कारण स्वरूप आणि परमात्मा दोन्हीही ''नित्यप्राप्त'' तसेच ''आपले'' आहेत. जसे आपल्या खिशातून पैसे काढणे-चोरी म्हटली जात नाही,

प्रेरित होऊन मनुष्य जेव्हा कर्म करतो, तेव्हा त्या कर्मांचे संस्कार त्याच्या अंतःकरणात संचित होऊन भावी जन्म-मरणाला कारण बनतात. मनुष्ययोनीत केलेल्या कर्मांचे फल या जन्मात तसेच मृत्यूनंतरही अवश्य भोगावे लागते (१८।१२). म्हणून तादात्म्य, ममता आणि कामना असेल तर कर्मांपासून संबंध सुटू शकत नाही.

जेथून बंधन होते तेथूनच ते सुटू शकते—असा नियम आहे. जसे दोरीची जेथे गाठ पडली असेल तेथूनच ती सोडता येते. मनुष्ययोनीतच जीव शुभाशुभ कर्मांनी बांधला जातो, म्हणून मनुष्ययोनीतच तो मुक्त होऊ शकतो.

पहिल्या श्लोकात आलेल्या "**ऊर्ध्वमूलम्**" पदाचे तात्पर्य परमात्मा आहे. जे संसाराचे रचयिते, तसेच त्याचे मूळ आधार आहेत आणि येथे "**मूलानि**" पदाचे तात्पर्य तादात्म्य, ममता आणि कामनारूपी मूळ आहे, जी संसारात मनुष्याला बांधत असते. साधकाला या (तादात्म्य, ममता आणि कामनारूपी) मूळ्यांचे तर छेदन करावयाचे आहे आणि ऊर्ध्वमूल परमात्म्याचा आश्रय घ्यावयाचा आहे. ज्याचा उल्लेख "**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये**" पदाने याच अध्यायाच्या चौथ्या श्लोकात केलेला आहे.

मनुष्यलोकात कर्मानुसार बांधणाऱ्या तादात्म्य, ममता आणि कामनारूपी मूळ्या खाली आणि वर सर्व लोकात, सर्व योनीत व्यापून राहिल्या आहेत. पशू, पक्ष्यांचेही स्वतः-च्या शरीराशी "तादात्म्य" राहते, आपल्या संतानाविषयी "ममता" असते आणि भूक लागली असता खाण्यासाठी उत्तम पदार्थांची "कामना" होत असते. तसेच देवतांच्या ठिकाणीही आपल्या शरीराविषयी "तादात्म्य", प्राप्त पदार्थाविषयी "ममता" आणि अप्राप्त भोगांची "कामना" राहत असते. अशा प्रकारे तादात्म्य, ममता आणि कामनारूपी दोष कोण्या ना कोण्या रूपात उच्च, नीच सर्वच योनीत राहत असतात. परंतु मनुष्ययोनीशिवाय दुसऱ्या योनीमध्ये हे बांधणारे ठरत नाहीत. जरी मनुष्ययोनीशिवाय देवादी योनीमध्येही विवेक राहत असतो परंतु भोगांचे अधिक्य असल्याने तसेच भोग भोगण्यासाठीच त्या योनीमध्ये गेल्यामुळे त्या विवेकाचा उपयोग होऊ शकत नाही. म्हणून त्या योनीमध्ये उपर्युक्त दोषांपासून स्व ला (विवेकाने) वेगळे पाहणे संभवत नाही. मनुष्ययोनीच अशी आहे, ज्यामध्ये (विवेक असल्याने) मनुष्य असा अनुभव करू शकतो की, मी (स्वरूपाने) तादात्म्य, ममता आणि कामनारूपी दोषांपासून सर्वथा रहित आहे.

भोगांच्या परिणामावर दृष्टी ठेवण्याची योग्यताही मनुष्यशरीरातच आहे. परिणामावर दृष्टी न ठेवता भोग भोगणाऱ्या मनुष्याला पशू म्हणणेही जणू पशुयोनीची निंदाच करणे आहे, कारण पशू तर आपले कर्मफल भोगून मनुष्य-योनीकडे येत आहेत, परंतु हा मनुष्य तर निषिद्ध भोग भोगून पशुयोनीकडेच जात आहे.

***संबंध**—मागील दोन श्लोकांत संसारवृक्षाचे जे वर्णन केले गेले आहे. त्याचे काय प्रयोजन आहे, हे पुढील श्लोकात भगवान् सांगत आहेत.*

**न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्न च सम्प्रतिष्ठा।**
**अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा॥ ३॥**

तसेच स्वरूप अथवा परमात्मा (जे आपले तसेच आपल्यात आहेत) यांची इच्छा करणे "कामना" म्हटली जात नाही. संसाराची वस्तू संसाराच्याच सेवेमध्ये उपायोगात आणणे याची इच्छाही "कामना" नव्हे तर त्याग आहे. कारण "कामना" घेण्याची असते, देण्याची नसते. तात्पर्य जी वस्तू आपली आणि अविनाशी आहे, तिची इच्छा करणे आवश्यकता (भूक) आहे आणि जी वस्तू दुसऱ्याची तसेच नाशवान् आहे, तिला दुसऱ्याला देण्याची इच्छा करणे "त्याग" आहे. जसे शरीराची भूक मिटविण्यासाठी भोजनाची इच्छा करणे एका प्रकाराने "कामना" होत नाही, तसेच "स्व" ची भूक मिटविण्यासाठी परमात्मतत्त्वाची इच्छा करणे "कामना" होत नाही. कामना नाशवान् जड वस्तूची होत असते आणि आवश्यकता चिन्मय तत्त्वाची होत असते. कामनेची पूर्ती होत नसते, तर ती वाढतच जाते, म्हणून तिचा त्याग करावयाचा आहे, परंतु आवश्यकतेची पूर्ती होत असते. त्या आवश्यकतेच्या पूर्तीसाठी तीन उपाय आहेत. कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग. मनुष्याने सांसारिक नाशवान् वस्तूंना आपले मानले आहे, ज्यामुळे तो संसाराचा गुलाम झाला आहे. म्हणून तो सर्वांच्या हिताच्या उद्देशाने त्या नाशवान् वस्तूंना संसाराच्या समजून संसाराच्या सेवेत, हितात लावील तर, त्याची गुलामी (पराधीनता) समाप्त होईल आणि तो स्वतंत्र होईल—हा कर्मयोग आहे. परमात्मा तर आपले स्वरूप आहे. जीव त्यापासून वेगळा नाही. केवळ नाशवान् वस्तूंशी आपला संबंध मानल्याने तो आपल्या स्वरूपापासून च्युत झाला आहे. म्हणून नाशवानाच्या संबंधाचा त्याग करेल, तर आपल्या स्वरूपाचा बोध होतो—हा ज्ञानयोग आहे. भगवान् अंशी आहे आणि जीव अंश आहे आणि त्यांचा परस्पर नित्यसंबंध आहे. केवळ नाशवान् वस्तूला आपले मानले आहे, ज्यामुळे तो भगवंतापासून विमुख झाला आहे. नाशवानाला आपले न मानता केवळ भगवंतालाच आपले मानल्याने तो स्वतः भगवंताला सम्मुख होईल आणि त्याला भगवत्प्रेम प्राप्त होईल—हा भक्तियोग आहे. तात्पर्य नाशवान् वस्तूला आपली मानल्याने हा जीव संसाराचा गुलाम, आपल्या स्वरूपापासून च्युत आणि भगवंताला विमुख झाला आहे. जर त्याने नाशवान् वस्तूला आपली मानणार नाही (जी आपली नाहीच), तर संसाराची गुलामी समाप्त होईल, आपल्या स्वरूपाचा बोध होईल आणि भगवत्प्रेमाची प्राप्ती होईल.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अस्य** | = या संसार-वृक्षाचे (जसे) | **आदिः** | = आदीही | **एनम्** | = या |
| **रूपम्** | = रूप (दिसून येते), | **न** | = नाही (किंवा) | **सुविरूढमूलम्** | = दृढ मूळ असलेल्या |
| **तथा** | = तसे | **अन्तः** | = अंतही | **अश्वत्थम्** | = संसाररूपी अश्वत्थ वृक्षाला |
| **इह** | = येथे (विचार केल्यावर) | **न** | = नाही | **दृढेन** | = दृढ |
| **न, उपलभ्यते** | = पाहण्यात येत नाही, (कारण त्याचा) | **च** | = आणि | **असङ्गशस्त्रेण** | = असंगतारूपी शस्त्राद्वारा |
| | | **सम्प्रतिष्ठा** | = स्थितीही | **छित्त्वा** | = कापून— |
| | | **न** | = नाही | | |
| | | **च** | = म्हणून | | |

*व्याख्या*— **न रूपमस्येह तथोपलभ्यते**—याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकात संसारवृक्षाच्या विषयात म्हटले गेले आहे की, लोक याला अव्यय (अविनाशी) म्हणतात आणि शास्त्रातही वर्णन येते की, सकाम अनुष्ठान केल्याने लोक-परलोकात विशाल भोग प्राप्त होतात. अशा गोष्टी ऐकून मनुष्यलोकात, तसेच स्वर्गलोकात सुख, रमणीयता आणि स्थायीपणा वाटू लागतो. याच कारणाने अज्ञानी मनुष्य काम आणि भोग परायण होतात आणि ''यापेक्षा श्रेष्ठ सुख कोणते नाही'' असा त्यांचा निश्चय होतो. (२।४२,१६।११). जो-पर्यंत संसाराशी तादात्म्य, ममता आणि कामनेचा संबंध आहे, तोपर्यंत असेच वाटत असते. परंतु भगवंत म्हणतात की, विवेकवती बुद्धीने संसारापासून वेगळे होऊन अर्थात् संसाराशी संबंध-विच्छेद करून पाहिले असता त्याचे जसे रूप आपण आत्ता मानले आहे, तसे दिसून येत नाही अर्थात् हा संसार नाशवान् आणि दु:खरूप वाटू लागतो.

**नान्तो न चादिर्न च सम्प्रतिष्ठा**—कोणत्याही वस्तूचे आदी, मध्य आणि अंताचे ज्ञान दोन प्रकाराने होत असते— देशकृत आणि काळकृत. या संसाराचा आरंभ कोठून झाला आहे, मध्य कोठे आहे आणि याचा अंत कुठे होतो? अशा प्रकारे संसाराचा ''देशकृत'' आदी, मध्य आणि अंताचा पत्ता लागत नाही आणि केव्हापासून याचा आरंभ झाला आहे, किती अवधीपर्यंत हा राहील आणि याचा अंत केव्हा होणार? अशा प्रकारे संसाराचा ''काळकृत'' आदी, मध्य आणि अंत याचाही पत्ता लागत नाही.

मनुष्य एखाद्या विशाल प्रदर्शनामध्ये तऱ्हे तऱ्हेच्या वस्तू पाहून मुग्ध होऊन फिरत राहील तर तो त्या प्रदर्शनाचा आदि-अंत जाणू शकत नाही. त्या प्रदर्शनातून बाहेर निघाल्यावरच तो त्याचा आदि-अंत जाणू शकतो. त्याच-प्रमाणे संसाराशी संबंध मानून भोगाकडे वृत्ती ठेवून या संसाराचा आदि-अंत कधी जाणला जाऊ शकत नाही.

मनुष्याजवळ संसाराच्या आदि-अंताचा पत्ता लावण्यासाठी जी साधने (इंद्रिये, मन आणि बुद्धी) आहेत, ती सर्व संसाराचीच अंश आहेत. कार्य आपल्या कारणात तर विलीन होऊ शकते परंतु त्याला जाणू शकत नाही—हा नियम आहे. जसे मातीचे मडके आपल्यामध्ये पृथ्वीला आणू शकत नाही, तसेच व्यष्टी इंद्रिये, मन, बुद्धी; समष्टी संसार आणि त्याच्या कार्याला आपल्या माहितीत आणू शकत नाहीत. म्हणून संसारापासून (मन, बुद्धी, इंद्रिये ह्यापासूनही) वेगळे झाल्यावरच संसाराचे स्वरूप (स्व द्वारा) योग्य रीतीने जाणले जाऊ शकते.

वास्तविक संसाराची स्वतंत्र सत्ता (स्थिती) नाहीच. केवळ उत्पत्ती आणि विनाश याचा क्रम आहे. संसाराचा हा उत्पत्ती, विनाशाचा प्रवाहच स्थितीरूपाने दिसतो. वास्तविक पाहिले तर उत्पत्तीही नाही, केवल नाशच नाश आहे. ज्याचे स्वरूप एक क्षण देखील स्थायी रहात नाही, अशा संसाराला प्रतिष्ठा (स्थिती) कशी? संसाराशी आपला मानलेला संबंध सोडताच त्याचा आपल्यासाठी अंत होतो आणि आपल्या वास्तविक स्वरूपात अथवा परमात्म्यामध्ये स्थिती होते.

**विशेष गोष्ट**

या संसाराच्या आदी, मध्य आणि अंताचा पत्ता आज- पर्यंत कोणताही वैज्ञानिक लावू शकला नाही आणि लावूही शकत नाही. संसाराशी संबंध ठेवून अथवा सांसारिक भोग भोगत असताना संसाराचा आदी, मध्य आणि अंत शोधू इच्छिल, तर घाण्याच्या बैलाप्रमाणे आयुष्यभर जरी फिरत राहिला तरी हाताला काहीच लागणार नाही.

वास्तविक या संसाराचा आदी, मध्य आणि अंत याचा पत्ता लावण्याची आवश्यकताही नाही. संसाराशी आपण मानलेल्या संबंधाचा विच्छेद करण्याचीच आवश्यकता आहे.

संसार अनादि-सांत आहे अथवा अनादि-अनंत आहे अथवा प्रतीतीमात्र आहे इत्यादी विषयांवर दर्शनकारांमध्ये अनेक मतभेद आहेत. परंतु संसाराशी आपला संबंध असत् आहे, ज्याचा विच्छेद करणे आवश्यक आहे—या विषयावर

सर्वच दार्शनिक एकमत आहेत.

संसाराशी संबंध-विच्छेद करण्याचा सुगम उपाय, संसारापासून मिळालेल्या (मन, बुद्धी, इंद्रिये, शरीर, धन, संपत्ती इत्यादी) संपूर्ण सामुग्रीला ''आपली'' आणि ''आपल्यासाठी'' न मानता त्याला संसाराच्या सेवेमध्ये उपयोगात आणावे.

सांसारिक स्त्री, पुत्र, मान, मोठेपणा, धन, संपत्ती, आयू, निरोगता इत्यादी कितीही प्राप्त होवोत, एथपर्यंत की, संसारातील संपूर्ण भोग एकाच मनुष्याला मिळाले तरीही त्यापासून मनुष्य तृप्त होऊ शकत नाही. कारण जीव स्वतः अविनाशी आहे आणि सांसारिक भोग नाशवान आहेत. नाशवानापासून अविनाशी कसा तृप्त होऊ शकेल ?

**अश्वत्थमेनम् सुविरूढमूलम्**— संसाराला ''**सुविरूढ-मूलम्**'' म्हणण्याचे तात्पर्य तादात्म्य, ममता आणि कामनेमुळे हा संसार (प्रतिष्ठारहित असूनही) दृढ मूळ असणारा वाटतो.

व्यक्ती, पदार्थ, क्रिया इत्यादीविषयी आसक्ती, ममता असल्याकारणाने सांसारिक बंधन जास्तीत जास्त दृढ होत जाते. ज्या पदार्थ, व्यक्तीविषयी आसक्ती, ममतेचा घनिष्ठ संबंध होतो, त्यांना मनुष्य आपले स्वरूपच समजू लागतो. जसे धनात ममता असल्याने त्याच्या प्राप्तीमध्ये मनुष्य फार प्रसन्न होतो आणि त्याला ''मी मोठा धनी आहे'' असा अभिमान होतो. धनाच्या नाशाने तो आपला नाश समजू लागतो. लोभ वाढल्याने धन प्राप्तीसाठी तो अन्याय, पाप, इत्यादी न करण्यालायक कामेही करून बसतो. मग इतका लोभ वाढतो की, त्याच्या अंतःकरणात असा दृढ निश्चय होतो की, असत्य, कपट, बेइमानी इत्यादीविना धन कमावलेच जाऊ शकत नाही. त्याला असा विचारच येत नाही की, ''पापाने धन मिळवून मी या ठिकाणी किती दिवस राहणार ? पापाने मिळविलेले धन शरीराबरोबरच येथे राहून जाईल परंतु धनासाठी केलेली असत्य, कपट, बेइमानी, चोरी इत्यादी पापे तर माझ्याबरोबर येतील,* ज्यामुळे माझी परलोकात किती दुर्गती होईल'' इत्यादी. एवढेच नव्हे, तर तो दुसऱ्यांनाही प्रेरणा करू लागतो की, ''धन कमविण्यासाठी पाप करण्यात कोणता दोष नाही, हा तर व्यापार आहे, यात असत्य बोलणे, फसविणे इत्यादी सर्व उचितच आहे'' इत्यादी. असा दुर्भाव निर्माण होणे हेच तादात्म्य, ममता आणि कामनारूपी मुळ्यांचे दृढ होणे आहे. अशा प्रकारच्या दूषित भावांच्या दृढमूल होण्याने मनुष्य तसाच बनतो (१७।३)

ह्या तादात्म्य, ममता आणि कामनारूपी मूळ्या अंतःकरणात इतक्या खोलवर गेलेल्या आहेत की, ग्रंथ-पठन, सत्संग श्रवण तसेच विचार-विवेचन केल्यानेही त्या पूर्ण नष्ट होत नाहीत. बहुतेक साधक असे म्हणत असतात की, सत्संग-चर्चा ऐकत असताना ह्या दोषांच्या त्यागाची गोष्ट चांगली आणि सुगम वाटते, परंतु व्यवहारात आल्यावर तसे आचरण होत नाही. हे सोडू इच्छितात पण सुटत नाहीत. सांसारिक सुख घेण्याची इच्छा हीच ह्या दोषांच्या न सुटण्यात कारण बनते. साधकाकडून ही चूक होते की, तो सांसारिक सुखही घेऊ इच्छितो आणि त्याबरोबरच दोषापासून वाचू इच्छितो. जसे लोभी व्यक्ती विषयुक्त लाडूही खाऊ इच्छितो आणि विषबाधाही होऊ नये असेही इच्छितो. असे होणे कधीच शक्य नाही. संसारापासून कधीही थोडीसुद्धा सुखाची आशा न ठेवल्यास याची पक्की मूळेही आपोआप नष्ट होतात.

दुसरी गोष्ट अशी आहे की, ''तादात्म्य, ममता आणि कामना नाहीशी होणे फार कठीण आहे'' साधकाची ही समजूतच या दोषांना नाहीशी होऊ देत नाही. वास्तविक तर हे आपोआप समाप्त होत आहेत. कोणत्याही मनुष्यात हे दोष नेहमी राहत नाहीत. उत्पन्न आणि नष्ट होत राहतात, परंतु आपल्या समजूतीमुळेच हे स्थायी दिसतात. म्हणून साधकाने या दोषांना नष्ट करणे कठीण आहे असे कधीही मानू नये.

**असङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा**—भगवान् म्हणतात की, जरी या संसारवृक्षाची आवांतर मूळे फार पक्की आहेत, तरीही ती दृढ असंगतारूपी शस्त्राने तोडली जाऊ शकतात. कोणत्याही स्थान, व्यक्ती, वस्तू, परिस्थिती इत्यादीविषयी मनामध्ये आकर्षण, सुखबुद्धीचे होणे आणि त्यांच्या संबंधाने स्वतः आपल्याला मोठे तसेच सुखी मानणे, पदार्थ प्राप्त झाल्याने अथवा संग्रह झाल्याने प्रसन्न होणे—हाच ''संग'' म्हटला जातो. याचे न होणेच असंगता अर्थात् वैराग्य आहे. वैराग्याचे दोन प्रकार आहेत (१) साधारण वैराग्य आणि (२) दृढ वैराग्य. दृढ वैराग्याला उपरती अथवा ''पर वैराग्य'' ही म्हणतात.

## वैराग्यसंबंधी विशेष गोष्ट

वैराग्याची अनेक रूपे आहेत. ती पुढील प्रमाणे—

* धनानि भूमौ पशवश्च गोष्ठे नारी गृहद्वारि सुताः स्मशाने। देहश्चितायां परलोकमार्गे धर्मानुगो गच्छति जीव एकः॥

शरीर सोडताना धन तिजोरीत पडलेले राहते, पशू गोठ्यामध्ये बांधलेले राहतात, पत्नी घराच्या दरवाज्यापर्यंतच साथ देते, पुत्र स्मशानापर्यंतच साथ देतात तसेच शरीर चितेपर्यंत साथ देते यानंतर परलोक मार्गात केवळ धर्मच जीवाबरोबर जातो.

पहिले वैराग्य धन, घर, जमीन, इत्यादी पदार्थांविषयी होत असते. या पदार्थांचा स्वरूपाने त्याग केल्यावरही जर मनात त्यांचे महत्त्व कायम असेल आणि "मी त्यागी आहे" असा अभिमान असेल तर हे खरे वैराग्यच नव्हे. अंत:करणात जड पदार्थांचे थोडे देखील महत्त्व व आकर्षण न राहणे—हेच वैराग्य आहे.

दुसरे वैराग्य आपले म्हणविले जाणारे माता, पिता, स्त्री, पुत्र, भाऊ, भावजय इत्यादी (परिवार) विषयी असते. त्यांची सेवा करणे अथवा त्यांना सुख देण्यापुरताच त्यांच्याशी आपला संबंध मानला पाहिजे. आपल्या सुखासाठी त्यांच्याशी किंचिन्मात्रही आपला संबंध न मानणेच बंधु-बांधवांपासून वैराग्य आहे.

तीसरे आणि वास्तविक वैराग्य आपल्या शरीराविषयी असते. जर शरीराशी संबंध कायम असेल तर संपूर्ण संसाराशी संबंध कायमच असतो, कारण शरीरच संसाराचे बीज अथवा अंश आहे. शरीराशी तादात्म्य न राहणेच शरीराविषयीचे वैराग्य आहे.

तादात्म्याचा (शरीराशी मानलेली एकता अर्थात् अहंता) नाश करण्यासाठी साधकाने प्रथम मान, सन्मान, पूजा, धन, इत्यादीच्या कामनेचा त्याग केला पाहिजे. यांच्या कामनेचा त्याग केल्यावरही (शरीराच्या) "नावा" विषयी ममता राहील्यामुळे यश, कीर्ती, मोठेपणा इत्यादीची कामना राहते. ह्याच कारणामुळे मृत्यूनंतरही आपल्या नावाची कीर्ती, आपले स्मारक उभारणेविषयीची इच्छा इत्यादी सूक्ष्म कामना राहून जातात. या सर्व कामनांचा नाश करणे आवश्यक आहे. कधी कधी साधकाच्या अंत:करणात दुसऱ्यांची प्रशंसा ऐकून, दुसऱ्याचा मोठेपणा पाहून इर्ष्येचा भाव जागृत होतो. म्हणून याचाही नाश करणे आवश्यक आहे.

उपर्युक्त कामनांचा नाश केल्यानंतर शरीरात ममत्व राहते. ह्या ममतेचा संबंध मृत्यूनंतरही कायम राहतो. याच कारणामुळे मृतशरीर जाळल्यानंतरही अस्थी गंगेत नेऊन टाकल्याने जीवाची (ज्याने शरीराविषयी ममता केली आहे) पुढे गती होत असते. विवेक (जड-चेतन, प्रकृती-पुरुष अथवा शरीर-शरीरी यांच्या भिन्नतेचे ज्ञान) जागृत झाल्यावर ममतेचा नाश होतो. कामना आणि ममता—दोन्हींचा नाश झाल्यानंतर तादात्म्य (अहंता) नष्ट होते, अर्थात् फारच सूक्ष्म स्वरूपात राहते. तादात्म्याचा अत्यंताभाव भगवत्प्रेमाची प्राप्ती झाल्यावर होतो.

जेव्हा मनुष्य स्वत: असा अनुभव करून घेतो की, "मी शरीर नाही, शरीर माझे नाही", तेव्हा कामना, ममता आणि तादात्म्य तिन्ही समाप्त होतात. हेच खरे वैराग्य आहे.

ज्याच्या अंत:करणात दृढ वैराग्य आहे, त्याच्या अंत:करणील संपूर्ण वासनांचा नाश होतो. आपल्या स्वरूपाहून विजातीय (जड) पदार्थ—शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीशी थोडाही संबंध न मानता, "सर्वांचे कल्याण होवो, सर्व सुखी होवोत, सर्व निरोगी होवोत, कधी कुणाला किंचिन्मात्रही दु:ख न होवो" *हा भाव राहणेच दृढ वैराग्याचे लक्षण आहे.

"हे" (इदम्) रूपाने जाणण्यात येणाऱ्या स्थूल, सूक्ष्म आणि कारणशरीरासह संपूर्ण संसाराला जाणणारा "मी" (अहम) म्हटला जातो. "हे" (जाणण्यात येणारे दृश्य) आणि "मी" (जाणणारा द्रष्टा) कधी एक असू शकत नाही—हा नियम आहे. अशा प्रकारे संसार आणि शरीर नष्ट होणारे आहे आणि मी (स्व) अविनाशी आहे. या विवेकाचा आदर करून स्वत: आपल्याला संसार आणि शरीराहून संपूर्णपणे वेगळे असल्याचा अनुभव घेणेच असंग शस्त्राने संसारवृक्षाचे छेदन करणे आहे. या विवेकाला महत्त्व न दिल्यामुळेच ह्या संसारवृक्षाच्या मूळ्या फार खोलवर गेल्या असून दृढ असल्याचे वाटते.

सांसारिक वस्तूंचा अत्यंताभाव अर्थात् सर्वथा नाश तर होऊ शकत नाही, परंतु त्यांच्याविषयी असलेल्या आसक्तीचा संपूर्णपणे अभाव होऊ शकतो. म्हणून "छेदन" याचे तात्पर्य सांसारिक वस्तूंचा नाश करणे नव्हे. तर त्याविषयी असलेली आपली आसक्ती नाहीशी करणे आहे. संसाराशी संबंध-विच्छेद झाल्यावर संसाराचा आपल्यासाठी सर्वथा अभाव होऊन जातो, ज्याला "आत्यन्तिक प्रलय" ही म्हणतात. जे आपले स्वरूप नाही तसेच ज्याच्याशी आपला वास्तविक संबंध नाही, त्याचाच त्याग (छेदन) होत असतो. आपण स्वरूपाने चेतन आणि अविनाशी आहोत आणि संसार जड आणि विनाशी आहे. म्हणून आपला संसाराशी संबंध अवास्तविक आणि भ्रमाने मानलेला आहे. स्वरूपाने आपण संसाराशी असंगच आहोत. पूर्वीपासूनच जो असंग असतो तोच असंग होत असतो—असा नियम आहे. म्हणून संसाराशी आपली असंगता स्वत: सिद्ध आहे. या वास्तविकतेला दृढतेने मानले पाहिजे. संसारवृक्ष कितीही सुविरुढमूल (पक्क्या मूळ्यांचा) असो त्याच्याशी आपला संबंध मानला नाही तर तो आपोआप तुटून पडतो. कारण संसाराशी आपला संबंध नाहीच, केवळ मानलेला आहे. म्हणून संसाराशी आपला संबंध न मानल्याने त्याचे छेदन होते. याविषयी साधकाने संदेह करू नये. मग (आरंभी)

* सर्वे भवन्तु सुखिन: सर्वे सन्तु निरामया:। सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद् दु:खभाग् भवेत्॥

व्यवहारात असे दिसून येवो अथवा न येवो.

जीवाने स्वतःहून अज्ञानाने शरीर-संसाराशी आपला संबंध मानला होता. म्हणून त्याचे छेदन करण्याची जबाबदारीही जीवावरच येते. म्हणून भगवान् त्याचेच छेदन करण्याविषयी सांगत आहेत.

## संसाराशी संबंध-विच्छेद करण्याचे काही सुगम उपाय—

(१) काहीही घेण्याची इच्छा न ठेवता संसारापासून प्राप्त झालेल्या सामुग्रीला संसाराच्या सेवेतच उपयोगात आणणे.

(२) सांसारिक सुखाच्या (भोग आणि संग्रह) कामनेचा संपूर्णपणे त्याग करणे.

(३) संसाराच्या आश्रयाचा सर्वथा त्याग करणे.

(४) शरीर संसाराशी असलेला "मी" आणि "माझे" पणा संपूर्णपणे नाहीसा करणे.

(५) "मी भगवंताचा आहे आणि भगवान् माझे आहेत" ह्या वास्तविक स्थितीवर दृढतेने पाय रोवून राहणे.

(६) मला एका परमात्म्याकडेच वाटचाल करावयाची आहे—अशा दृढ निश्चयाचे (व्यवसायात्मिका बुद्धी) होणे.

(७) शास्त्रविहित आपापल्या कर्तव्यकर्मांचे (स्वधर्म) पालन करणे.* (१८।४५)

(८) लहानपणी शरीर, पदार्थ, परिस्थिती, विद्या, सामर्थ्य, इत्यादी जसे होते, तसे आता नाही. अर्थात् ते सर्वचे सर्व बदलून गेले, पण "मी" (स्व) मात्र तोच आहे, बदललो नाही—आपल्या या अनुभवाला महत्त्व देणे.

(९) संसारास दिलेल्या सत्तेचा अत्यंत अभाव करणे.

**परिशिष्ट भाव**—भगवंताने स्वतःच्या विषयात म्हटले आहे—**'अहमादिश्च मध्यं च भूतानामन्त एव च'** (गीता १०। २०), **'सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन'** (गीता १०। ३२) आणि येथे संसाराच्या विषयात म्हणतात—**'नान्तो न चादिर्न च सम्प्रतिष्ठा'**. तात्पर्य हे आहे की, भगवान् आदीही आहेत, अंतीही आहेत आणि मध्यातही आहेत. परंतु संसार आदीही नाही, अंतीही नाही आणि मध्यातही नाही, अर्थात् संसार नाहीच—**'नासतो विद्यते भावः'** (गीता २। १६). म्हणून एका भगवंताशिवाय काहीही नाही.

**'असङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा'**—या पदांत आलेल्या **'छित्त्वा'** शब्दाचा अर्थ कापणे अथवा नाश (अभाव) करणे असा नाही, तर संबंध-विच्छेद करणे आहे. कारण हा संसार-वृक्ष भगवंताची अपरा-प्रकृती असल्यामुळे अव्यय आहे. स्वरूप असंग आहे—**'असङ्गो ह्ययं पुरुषः'** (बृहदा० ४। ३। १५). स्वरूपात गुणसंग नाही. गुणसंगानेच जन्म-मरण होते—**'कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु'** (गीता १३। २१). म्हणून स्वरूपाच्या असंगतेचा, निर्लिप्ततेचा, अजरता-अमरतेचा अनुभव करून त्यात स्थित होणे हेच संसार-वृक्षाचे छेदन करणे आहे.

संसार आसक्तीमुळेच दिसतो. ज्या वस्तूविषयी आसक्ती असते, त्याच वस्तूची सत्ता व महत्ता दिसते. जर आसक्ती राहिली नाही तर संसाराची सत्ता दिसूनही महत्ता राहत नाही. म्हणून **'असङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा'** पदांचे तातपर्य आहे—संसारसंग संपूर्णपणे समाप्त करणे अर्थात् आपल्या अंतःकरणात परमात्म्याशिवाय इतर कोणाशी संबंध मानू नये. संपूर्ण सृष्टीतील कोणत्याही वस्तूला आपली आणि आपल्यासाठी न मानणे. वास्तविक संसाराची सत्ता बंधनकारक नाही, तर त्याच्याशी आसक्तिपूर्वक मानलेला संबंध हाच बंधनकारक आहे. सत्ता बाधक नाही, आसक्ती बाधक आहे. म्हणून ईतर दार्शनिक तर संसाराला असत्, सत् इत्यादी अनेक प्रकाराने म्हणतात, परंतु भगवान् संसाराशी संबंध-विच्छेद करण्याचा विचार सांगतात. संबंध-विच्छेद केल्यास संसाराचा संसाररूपाने अभाव होतो आणि तो भगवद्रूपाने दिसू लागतो—**'वासुदेवः सर्वम्'**.

***संबंध**—संसारवृक्षाचे छेदन केल्यानंतर साधकाने काय केले पाहिजे याचे विवेचन पुढील श्लोकात करतात.*

**ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः।**
**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी॥ ४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ततः** | = त्यानंतर | **परिमार्गितव्यं** | = शोध घेतला पाहिजे. | **न, निवर्तन्ति** | = संसारात परत येत नाहीत. |
| **तत्** | = त्या | **यस्मिन्** | = जे | | |
| **पदम्** | = परमपदाचा (परमात्म्याचा) | **गताः** | = प्राप्त झाल्यावर मनुष्य | **च** | = आणि |
| | | **भूयः** | = पुन्हा | **यतः** | = ज्याच्याकडून |

* धर्म ते बिरति जोग ते ग्याना। ग्यान मोच्छप्रद बेद बखाना। (मानस ३।१६।१)

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **पुराणी** | = अनादिकालापासून चालत आलेली | **प्रसृता** | = विस्तार पावली आहे | **पुरुषम्, एव** | = पुरुष परमात्म्यालाच |
| **प्रवृत्ति** | = (ही) सृष्टी | **तम्** | = त्या | **प्रपद्ये** | = मी शरण आहे. |
| | | **आद्यम्** | = आदी | | |

***व्याख्या*— तत: पदं तत्परिमार्गितव्यम्**—भगवंतांनी पूर्व श्लोकात ''**छित्त्वा**'' पदाने संसाराशी संबंध-विच्छेद करण्याविषयी सांगितले. यावरुन हे सिद्ध होते की, परमात्म्याचा शोध करण्यापूर्वी संसाराशी संबंध-विच्छेद करणे फार आवश्यक आहे. कारण परमात्मा तर संपूर्ण देश, काळ, वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती इत्यादीमध्ये जसेच्या तसे विद्यमान आहेत, केवळ संसाराशी आपला संबंध मानल्यामुळेच नित्यप्राप्त परमात्म्याच्या अनुभवात अडथळा निर्माण झाला आहे. संसाराशी संबंध कायम राहिल्याने परमात्म्याचा शोध घेण्यात शिथिलता येते आणि जप, कीर्तन, स्वाध्याय इत्यादी सर्व काही करूनही विशेष लाभ होत नाही. म्हणून साधकाने प्रथम संसाराशी संबंध-विच्छेद करण्यासच महत्त्व दिले पाहिजे.

जीव परमात्म्याचाच अंश आहे. संसाराशी संबंध मानल्यामुळेच तो आपल्या अंशीच्या (परमात्मा) नित्य संबंधाला विसरून गेला आहे. म्हणून ही विस्मृती मिटल्यावर ''मी भगवंताचाच आहे'' या वास्तविकतेची स्मृती होत असते. ह्याविषयी भगवान् म्हणतात की, त्या परमपदाशी (परमात्मा) नित्यसंबंध पूर्वीपासूनच विद्यमान आहे. केवळ त्याचा शोध घ्यावयाचा आहे.

संसाराला आपले समजल्याने नित्यप्राप्त परमात्मा अप्राप्त दिसू लागतात आणि अप्राप्त संसार प्राप्त दिसू लागतो. म्हणून परमपदाला (परमात्मा) ''तत्'' पदाने लक्ष्य करून भगवान् म्हणतात की, जे परमात्मा नित्यप्राप्त आहेत, त्यांचाच पूर्ण तऱ्हेने शोध घ्यावयाचा आहे.

शोध त्याचाच घेतला जातो ज्याचे अस्तित्व पूर्वीपासून-च असते. परमात्मा अनादी आणि सर्वत्र परिपूर्ण आहेत. म्हणून येथे शोध घेण्याचा अर्थ असा नाही की, एखाद्या विशेष साधनाने परमात्म्याला शोधून काढावयाचे आहे. जो संसार (शरीर, परिवार, धनादी) कधी आपला नव्हता, नाही, होणार नाही, त्याचा आश्रय न घेता, जे परमात्मा नेहमीच आपले आहेत, आपल्यात आहेत आणि आत्ता आहेत, त्यांचा आश्रय घेणेच त्यांचा शोध करणे आहे.

साधकाला साधन, भजन करणे तर फार आवश्यक आहे, कारण त्यासारखे उत्तम दुसरे कोणतेच काम नाही. परंतु ''परमात्मतत्त्वाला साधन, भजनाद्वारा प्राप्त करून घेऊ'' असे समजणे योग्य नाही. कारण असे समजल्याने अभिमान वाढतो, जो परमात्मप्राप्तीत बाधक आहे. परमात्मा कृपेने प्राप्त होतात. त्यांना कोणत्या साधनेने खरीदले जाऊ शकत नाही. साधनेने केवळ असाधनेचा (संसाराशी तादात्म्य, ममता आणि कामनेचा संबंध अथवा परमात्म्याशी विमुखता) नाश होतो, जी आपणच केलेली असते. म्हणून साधनेचे महत्त्व असाधन नष्ट करण्यापुरतेच समजले पाहिजे. असाधन नष्ट करण्याची खरी तळमळ असेल तर ते नष्ट करण्याची शक्ती देखील परमात्म्याच्याच कृपेने मिळते.

साधकांच्या अंत:करणात बहुतेक अशी एक धारणा दृढ होऊन बसलेली असते की, जसे उद्योग केल्याने संसारातील पदार्थ प्राप्त होतात, तसेच साधन करीत करीत (अंत:करण शुद्ध झाल्यावर) परमात्मप्राप्ती होते. परंतु वास्तविक अशी गोष्ट नाही, कारण परमात्मप्राप्ती कोणत्याही कर्माचे (साधन-तपश्चर्यादी) फल नाही मग ते कर्म किती-ही श्रेष्ठ असो! कारण श्रेष्ठातल्या श्रेष्ठ कर्माचाही आरंभ आणि अंत होत असतो. मग त्या कर्माचे फल नित्य कसे राहील? कर्माचे फलही आदी अंतयुक्त असते. म्हणून नित्य परमात्मतत्त्वाची प्राप्ती कोणत्याही कर्माने होत नाही. वास्तविक त्याग, तपश्चर्या इत्यादीनी जडतेशी (संसार आणि शरीर) संबंध-विच्छेद होतो जो अज्ञानाने मानलेला असतो. संबंध-विच्छेद होताच जे तत्त्व सर्वत्र आहे, सदा आहे, नित्यप्राप्त आहे, त्याची अनुभूती होते. त्याची स्मृती जागृत होते.

अर्जुनसुद्धा पूर्ण उपदेश ऐकल्यानंतर शेवटी म्हणतात ''**स्मृतिर्लब्धा**'' (१८।७३), ''मी स्मृती प्राप्त करून घेतली आहे''. जरी विस्मृती ही अनादी आहे, तरीही ती अंत होणारी आहे. संसाराच्या स्मृतीत आणि परमात्म्याच्या स्मृतीत फार फरक आहे. संसाराच्या स्मृतीनंतर विस्मृतीचे होणे शक्य आहे. जसे पक्षाघात (लखवा) झाल्यावर शिकलेल्या विद्येची विस्मृती होऊ शकते. या उलट परमात्म्याची स्मृती एकदा झाल्यावर मग कधीच विस्मृती होत नाही (२।७२, ४।३५) जसे लखवा झाल्यावर आपल्या सत्तेची (''मी आहे'') विस्मृती होत नाही. कारण संसाराशी संबंध कधी होत नाही आणि परमात्म्याचा संबंध कधी सुटत नाही.

शरीर संसाराशी माझा कोणताही संबंध नाही, या तत्त्वाचा अनुभव करणे हेच संसार-वृक्षाचे छेदन करणे आहे आणि मी परमात्म्याचा अंश आहे, या वास्तविकतेत नित्य निरंतर स्थित राहणे हेच परमात्म्याचा शोध घेणे आहे. वास्तविक संसाराशी संबंध-विच्छेद होताच नित्यप्राप्त

परमात्मतत्त्वाची अनुभूती होत असते.

**यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः**—ज्याला पहिल्या श्लोकात "**उर्ध्वमूलम्**" पदाने तसेच या श्लोकात "**आद्यम् पुरुषम्**" पदांनी म्हटले गेले आहे आणि पुढे सहाव्या श्लोकात ज्याचे विस्ताराने वर्णन होणार आहे, त्याच परमात्मतत्त्वाचा निर्देश येथे "**यस्मिन्**" पदाने केला गेला आहे.

जसे पाण्याचा थेंब समुद्रात मिळाल्यानंतर पुन्हा त्यापासून वेगळा होऊ शकत नाही, तसेच परमात्म्याचा अंश (जीवात्मा) परमात्म्याला प्राप्त झाल्यावर त्यांच्यापासून पुन्हा वेगळा होऊ शकत नाही अर्थात् पुन्हा संसारात परत येत नाही. उच्च, नीच योनीत जन्म घेण्याला कारण प्रकृती अथवा तिचे कार्य गुण यांचा संगच आहे. (१३।२१) म्हणून साधक जेव्हा असंग शस्त्राने गुणांच्या संगाचे सर्वथा छेदन (असत्च्या संबंधाचा सर्वथा त्याग) करतो, तेव्हा त्याचा जन्म घेण्याचा प्रश्नच उद्भवत नाही.

**यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी**—संपूर्ण सृष्टीची रचना करणारे एक परमात्माच आहेत. तेच या संसाराचे आश्रय आणि प्रकाशक आहेत. मनुष्य अज्ञानाने सांसारिक पदार्थांत सुख पाहून संसाराकडे आकर्षित होतो आणि संसाराचे रचयिता परमात्म्याला विसरून जातो. परमात्म्याने रचलेला संसारही जर इतका प्रिय वाटतो तर (संसाराचे रचयिते) परमात्मा किती तरी प्रिय वाटले पाहिजेत! रचलेल्या वस्तूविषयी आकर्षण होणे म्हणजे एका प्रकाराने रचयित्याचेच आकर्षण आहे (१०।४१), तरीही मनुष्य अज्ञानाने त्या आकर्षणात परमात्म्याला कारण न मानता संसारालाच कारण मानतो आणि त्यातच फसतो.

प्राणीमात्राचा असा स्वभाव असतो की, ज्याला तो सर्वात श्रेष्ठ मानतो अथवा ज्याच्याकडून त्याला काही प्राप्त होण्याची आशा राहते. तो त्याचाच आश्रय घेऊ इच्छितो आणि त्याच्याच प्राप्तीसाठी जीवन व्यतीत करू इच्छितो, जसे संसारात लोक रुपये मिळविण्यात आणि त्यांचा संग्रह करण्यात मोठ्या तत्परतेने कार्यरत असतात. कारण त्यांना पैशांनी संपूर्ण मनोवांच्छित वस्तू मिळण्याची आशा असते. ते विचार करतात—"शरीरनिर्वाहाच्या वस्तू तर पैशांनी मिळतातच, अनेक प्रकारचे भोग, ऐशाराम विलासांची साधनेसुद्धा पैशांनी मिळतात. म्हणून पैसे मिळाल्यावर मी सुखी होईल तसेच लोक मला धनी समजून माझा पुष्कळ बहुमान करतील" अशा प्रकारे धनाला सर्वोपरी मानल्यावर ते लोभापायी अन्याय, पापांचीही परवा करीत नाहीत. इतके की, ते शरीराच्या आरामाचीही उपेक्षा करून पैसे कमविण्यात तसेच संग्रह करण्यातच तत्पर राहतात. त्यांच्या दृष्टीत पैशापेक्षा दुसरे काहीच श्रेष्ठ नसते. अशा प्रकारे साधकाला जेव्हा हे माहित होते की, परमात्म्यापेक्षा श्रेष्ठ काहीच नाही आणि त्यांच्या प्राप्तीत असा आनंद आहे की, जेथे सर्व सांसारिक सुखे फीकी पडतात (६।२२), तेव्हा तो परमात्म्यालाच प्राप्त करण्यासाठी तत्परतेने अग्रेसर होतो. (१५।१९)

**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये**—ज्याचा कोणी आदी नाही परंतु तो सर्वांचा आदी आहे (१०।२). त्या आदिपुरुष परमात्म्याचाच आश्रय (आधार) घेतला पाहिजे. परमात्म्याशिवाय इतर कोणाचाही आश्रय टिकणारा नाही. इतरांचा आश्रय वास्तविक आश्रय नाहीच, तर तो आश्रय घेणाऱ्याचाच नाश (पतन) करणारा आहे. जसे समुद्रात बुडत असलेल्या व्यक्तीसाठी मगरीचा आश्रय ! या मृत्युसंसार सागराचे सर्वच आश्रय मगरीच्या आश्रयाप्रमाणे आहेत. म्हणून मनुष्याने विनाशी संसाराचा आश्रय न घेता अविनाशी परमात्म्याचाच आश्रय घेतला पाहिजे.

जेव्हा साधक आपली सर्व शक्ती लावूनही दोष नाहीसे करण्यात यशस्वी होत नाही, तेव्हा तो आपल्या शक्तीविषयी निराश होतो. अगदी अशा वेळी जर त्याने (आपल्या शक्तीविषयी सर्वथा निराश होऊन) एकमात्र भगवंताचाच आश्रय घेतला, तर भगवंताच्या कृपाशक्तीने त्याचे दोष निश्चित नष्ट होतील आणि त्याला भगवत्प्राप्ती होईल.* म्हणून साधकाने भगवत्प्राप्तीविषयी कधीही निराश होऊ नये. भगवंताना शरण जाऊन निर्भय आणि निश्चिन्त व्हावे. भगवंतांना शरण होण्याने, त्यांच्या कृपेने विघ्नांचा नाश आणि भगवत्प्राप्ती दोन्हींची सिद्धी होते. (१८।५८,६२)

साधकाला जसे संसाराच्या संगाचा त्याग करावयाचा आहे, तसेच "असंगता" च्या संगाचाही त्याग करावयाचा आहे. कारण असंग झाल्यावरही "मी असंग आहे" असा सूक्ष्म अहंभाव (परिच्छिन्नता) राहू शकतो, जो परमात्म्याला शरण गेल्यावरच सुगमतेने समाप्त होऊ शकतो. परमात्म्याला शरण होण्याचे तात्पर्य, आपल्या म्हणविल्या जाणाऱ्या शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, अहम् (मी पणा) धन, परिवार, घर इत्यादी सर्वचे सर्व पदार्थांना परमात्म्याला अर्पण करणे अर्थात् त्या पदार्थांविषयीची आत्मीयता संपूर्णपणे काढून घेणे, हे आहे.

शरणागत भक्तात दोन भाव असतात. "मी भगवंताचा

* जब लगि गज बल अपनो बरत्यो, नेक सर्‌यो नहि काम।
निरबल है बलराम पुकार्‌यो आये आधे नाम॥ सुने री मैने निरबल के बल राम।

आहे आणि भगवान् माझे आहेत'' या दोन्हीतही ''मी भगवंताचा आहे आणि भगवंतासाठी आहे'' हा भाव अधिक उत्तम आहे. कारण ''भगवान् माझे आहेत आणि माझ्यासाठी आहेत'' या भावनेत आपल्यासाठी भगवंताकडून काही तरी प्राप्त होण्याची इच्छा राहते, म्हणून साधक भगवंताकडून मनमानी इच्छा करील. परंतु ''मी भगवंताचा आहे आणि भगवंतासाठी आहे'' या भावनेत केवळ भगवंताची इच्छा पूर्ण होईल. अशा प्रकारे साधकात आपल्यासाठी काही करण्याचा आणि मिळविण्याचा भाव न राहणे हीच वास्तविक अनन्य शरणागती आहे. अशा अनन्य शरणागतीने त्याचे भगवंताविषयी असे अनिर्वचनीय आणि अलौकिक प्रेम जागृत होते की, जे क्षती, पूर्ती आणि निवृत्तीरहित असते, ज्यात प्रियतम मिळाल्यावरही तृप्ती होत नाही आणि वियोगातही अभाव नसतो, जे प्रत्येक क्षणाला वर्धमान असते, ज्यात असीम, अपार आनंद आहे, ज्यामुळे आनंददात्या भगवंतांनाही आनंद मिळतो. तत्त्वज्ञान झाल्यावर जे प्रेम प्राप्त होत असते तेच प्रेम अनन्य शरणागतीनेही प्राप्त होते.

''**एव**'' पदाचे तात्पर्य दुसऱ्या सर्व आश्रयांचा त्याग करून एकमात्र भगवंताचाच आश्रय घ्यावा. हाच भाव गीतेत ''**मामेव ये प्रपद्यन्ते**'' (७।१४), ''**तमेव शरणं गच्छ**'' (१८।६२) आणि ''**मामेकं शरणं व्रज**'' (१८।६६) पदांतही आला आहे.

''**प्रपद्ये**'' म्हणण्याचा अर्थ ''मी शरण आहे'' हा आहे. येथे शंका होऊ शकते की, भगवान् कसे म्हणतात की ''मी शरण आहे''? भगवंतही कोणाला शरण होतात की काय? जर शरण होतात तर कोणाला होतात? याचे समाधान, असे आहे की, भगवंत कोणालाही शरण होत नाहीत. कारण ते सर्वोपरी आहेत. केवळ लोक शिक्षणासाठी भगवान् साधकाच्या भाषेत बोलून त्याला हे सांगतात की, त्याने ''मी शरण आहे'' अशी भावना करावी.

''परमात्मा आहेत'' आणि ''मी (स्व) आहे'' या दोन्हीत ''आहे'' च्या रूपात एकच परमात्म सत्ता विद्यमान आहे. ''आहे'' बरोबर ''मी'' आल्याने ''आहे'' एकदेशीय स्थितीला आला आहे जर ''मी'' रूपी एकदेशीय स्थिती सर्वदेशीय ''आहे'' यात विलीन केली तर ''केवळ परमात्माच आहे'' हेच राहील. ''मी आहे'' हे राहणारच नाही. जोपर्यंत स्व बरोबर बुद्धी, मन, इंद्रिये, शरीर इत्यादींचा संबंध मानून ''मी आहे'' कायम आहे, तोपर्यंत व्यभिचारदोष येत असल्यामुळे अनन्य शरणागती होत नाही.

परमात्म्याचा अंश असल्यामुळे जीव वास्तविक नेहमी परमात्म्याच्याच आश्रित राहतो, परंतु परमात्म्यापासून विमुख झाल्यावर (आश्रय घेण्याचा स्वभाव न सुटल्यामुळे) तो भ्रमाने नाशवान संसाराचा आश्रय घेऊ लागतो, जो कधी टिकत नाही, म्हणून तो दुःख प्राप्त करत राहतो. म्हणून साधकाने परमात्म्याशी असलेल्या आपल्या वास्तविक संबंधाला ओळखून एकमात्र परमात्म्याला शरण व्हावे.

**परिशिष्ट भाव**—संसार नित्य निवृत्त आहे, म्हणून त्याचा त्याग होतो—'**असङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा**' आणि परमात्मा नित्य प्राप्त आहे. म्हणून त्याचा शोध घेता येतो—'**ततः पदं तत्परिमार्गितव्यम्**'. निर्माण आणि शोध—दोन्हीत फार अंतर आहे. निर्माण अशी वस्तू होते जिचा पूर्वी अभाव असतो आणि शोध त्याचा होतो, जो पूर्वीपासूनच विद्यमान असतो. परमात्मा नित्य प्राप्त आहे आणि स्वतःसिद्ध आहे, म्हणून त्यांचा शेध घेता येतो, तो निर्माण होत नाही. जेव्हा साधक परमात्मसत्ता स्वीकार करतो तेव्हा शोध होतो. शोध घेण्याचे दोन प्रकार आहेत—एक तर कंठा कुठे तरी ठेवून विसरलो म्हणजे आपण ठिक-ठिकाणी त्याचा शोध करतो आणि दुसरे, कंठा गळ्यातच असावा परंतु भ्रम असा व्हावा की, कंठा हरवला, तर आपण ठिक-ठिकाणी त्याचा शोध करतो. परमात्म्याचा शोध गळ्यात असलेल्या कंठ्याचा शोध घेण्यासारखे आहे. वास्तविक परमात्मा हरवलेला नाही. संसारात आपल्या आसक्तीमुळे परमात्म्याकडे दृष्टी जात नाही. तिकडे दृष्टी न जाणे हेच त्याचे हरवणे आहे. तात्पर्य हे आहे की, ज्या परमात्म्याची आपण इच्छा करतो आणि ज्याचा आपण शोध करतो, तो परमात्मा नित्य-निरंतर आपल्यातच विद्यमान आहे! परंतु संसार आपल्यात नाही. जो आपल्यात आहे, त्याचा शोध केल्याने परिणामी तो प्राप्त होतो. परंतु जे आपल्यात नाही त्याचा शोध केल्याने परिणामी ते मिळत नाही, कारण त्याची वास्तविक सत्ताच नाही.

परमात्मा कधी अप्राप्त झाले नाहीत, अप्राप्त नाहीच, अप्राप्त होणे संभवतच नाही. त्यांची अप्राप्ती झाली नाही, तर विस्मृती झाली आहे. ही विस्मृती अनादी आणि सान्त (अंत होणारी) आहे. जसे दोन व्यक्ती परस्पर एक दुसऱ्याला ओळखत नाहीत, तर हा अपरिचय केव्हापासून आहे—हे कोणी सांगू शकत नाही. आपण संस्कृत भाषा जाणत नसलो तर हा अनभिज्ञपणा केव्हापासून आहे—हे आपण सांगू शकत नाही. तात्पर्य हे आहे की, व्यक्तींची सत्ता, आपली सत्ता, संस्कृत भाषेची सत्ता तर पूर्वीपासूनच आहे, परंतु त्यांचा परिचय पूर्वीपासून नाही. तसेच विस्मृतीच्या वेळीही परमात्म्याची सत्ता जशीच्या तशी आहे. परमात्मा तर नित्यप्राप्त आहेत, परंतु त्यांची विस्मृती असते अर्थात् तिकडे दृष्टी नसते, त्यांच्याशी विमुखता आहे, त्यांचा अपरिचय आहे,

त्यांच्या अप्राप्तीचा भ्रम आहे! पमात्म्याचा शोध केल्यास ही विस्मृती समाप्त होते आणि त्यांची प्राप्ती होते. परमात्म्याचा शोध करण्याचा उपाय आहे—जे विद्यमान नाही त्याचा त्याग करणे—'**असङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा**'. त्याग करण्याचे तात्पर्य आहे—त्याची सत्ता आणि महत्ता न मानता त्याच्याशी संबंध न जोडणे, त्याचा अस्वीकार करणे, म्हणून संसाराच्या त्यागातच परमात्म्याचा शोध ठेवलेला आहे. श्रीमद्भागवतात आले आहे—'**अतत्त्यजन्तो मृगयन्ति सन्तः**' (१०। १४। २८).

'**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये**'—संसाराशी संबंध-विच्छेद झाल्यास भावरूप स्वरूपात स्थिती होते आणि साधक मुक्त होतो. मुक्त झाल्यास संसाराची कामना तर समाप्त होते, परंतु प्रेमाची भूक शांत होत नाही. ब्रह्मसूत्रात आले आहे—'**मुक्तोपसृप्यव्यपदेशात**' (१। ३। २). 'त्या प्रेमस्वरूप भगवंताला मुक्त पुरुषांसाठीही प्राप्तव्य सांगितले गेले आहे.' तात्पर्य असे आहे की, स्वरूप ज्याचा अंश आहे, त्या अंशीच्या (परमात्म्याच्या) प्रेमाच्या प्राप्तीतच मानव-जीवनाची पूर्णता आहे. स्वरूपात निजानन्द (अखंड आनंद) आहे आणि अंशीत परमानंद (अनंत आनंद) आहे. जो मुक्तीत थांबत नाही, यात संतोष मानत नाही. त्याला प्रतिक्षण वर्धमान प्रेमाची प्राप्ती होते—'**मद्भक्तिं लभते पराम्**' (गीता १८। ५४). म्हणूनच भगवंताने संसाराशी संबंध-विच्छेद करण्याची अर्थात् मुक्त झाल्यानंतर परमात्म्याचा शोध करून त्यांना शरण जाण्याची गोष्ट सांगितली आहे.

***संबंध***—*जे महापुरुष आदिपुरुष परमात्म्याला शरण होऊन परमपदाला प्राप्त होतात त्यांच्या लक्षणांचे वर्णन पुढील श्लोकात करीत आहेत.*

## निर्मानमोहा जितसङ्गदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः।
## द्वन्द्वैर्विमुक्ताः सुखदुःखसञ्ज्ञैर्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत्॥ ५॥

**निर्मानमोहाः** = जे मानरहित आणि मोहरहित झाले आहेत, **जितसङ्गदोषाः** = ज्यांनी आसक्तिजन्य दोष जिंकले आहेत, **अध्यात्मनित्याः** = जे नित्य-निरंतर परमात्म्यातच मग्न आहेत, **विनिवृत्तकामाः** = जे (स्वतःच्या दृष्टीने) संपूर्ण कामनारहित झाले आहेत, **सुखदुःखसञ्ज्ञैः** = जे सुख-दुःखरूपी **द्वन्द्वैः** = द्वन्द्वापासून **विमुक्ताः** = मुक्त झाले आहेत (असे) **अमूढाः** = (उच्च स्थितीला प्राप्त झालेले) मोहरहित साधक भक्त **तत्** = त्या **अव्ययम्** = अविनाशी **पदम्** = परमपदाला (परमात्म्याला) **गच्छन्ति** = प्राप्त होतात.

*व्याख्या*—**निर्मानमोहाः**—शरीराविषयी मी, माझेपणा असल्यानेच मान, आदर-सत्काराची इच्छा होत असते. शरीराशी आपला संबंध मानल्यानेच शरीराच्या मान-सन्मानाला मनुष्य भ्रमाने स्वतःचा मान-सन्मान समजतो आणि फसतो. ज्या भक्तांची केवळ भगवंताशीच आत्मीयता असते, त्यांचा शरीराविषयी मी, माझेपणा राहत नसतो. म्हणून ते शरीराच्या मान-सन्मानाने प्रसन्न होत नाहीत. एकमात्र भगवंताला शरण झाल्याने त्यांचा शरीराविषयी मोह राहत नाही. तर मग त्यांना मान-सन्मानाची इच्छा होऊच कशी शकते?

केवळ भगवंताचाच उद्देश, ध्येय असल्याने आणि केवळ भगवंतालाच शरण, परायण राहण्याने ते भक्त संसाराला विमुख होतात. म्हणून त्यांना संसाराविषयी मोह राहत नाही.

**जितसङ्गदोषाः**—भगवंताविषयी आकर्षण होणे "प्रेम" आणि संसाराविषयी आकर्षण होणे "आसक्ती" म्हणविली जाते. ममता, स्पृहा, वासना, आशा इत्यादी दोष आसक्तीमुळेच होतात. केवळ भगवत्परायण झाल्याने भक्तांची सांसारिक भोगाविषयी आसक्ती राहत नाही. आसक्ती न राहिल्यामुळे भक्त आसक्तीपासून होणाऱ्या ममता इत्यादी दोषांना जिंकून घेतात.

आसक्ती प्राप्त आणि अप्राप्त—दोन्हीची होत असते, परंतु कामना अप्राप्ताचीच होत असते. म्हणून या श्लोकात "**विनिवृत्तकामाः**" पद वेगळे आले आहे.

**अध्यात्मनित्याः**— केवळ भगवंतालाच शरण जाण्याने भक्तांची अहंता बदलून जाते. मी भगवंताचा आहे आणि भगवान् माझे आहेत, मी संसाराचा नाही आणि संसार माझा नाही अशा प्रकारे अहंता बदलल्याने त्यांची स्थिती निरंतर भगवंतातच राहत असते.* कारण जशी मनुष्याची अहंता असते, त्याची स्थिती त्यातच असते. जसे जन्मानुसार मनुष्य

* जरी संपूर्ण प्राण्यांची स्थिती निरंतर त्या सर्वव्यापक, सर्वप्रकाशक, सर्वेश्वर भगवंतातच राहत असते, तरीपण अज्ञानाने आपली स्थिती भगवंतात न मानता संसारात मानतात, जसे—मी अमुक वर्ण, आश्रम, सांप्रदाय, नाव, जाती इत्यादीचा आहे. त्यांच्या ह्या विपरीत मान्यतेमुळेच ते बंधनात पडतात आणि वारंवार जन्मतात आणि मरतात.

आपल्याला ब्राह्मण मानतो, तर त्याची ब्राह्मणपणाची मान्यता नित्य-निरंतर राहत असते, अर्थात् तो नित्य-निरंतर ब्राह्मण-पणात स्थित राहत असतो मग त्याचे स्मरण करो की न करो तसेच जे भक्त आपला संबंध केवळ भगवंताशीच मानतात, ते नित्य-निरंतर भगवंतातच स्थित राहतात.

**विनिवृत्तकामाः—**संसाराचे ध्येय, लक्ष्य असल्यानेच संसाराची वस्तू, परिस्थिती इत्यादीची कामना होत असते अर्थात् "अमुक वस्तू, व्यक्ती इत्यादी मला मिळावी" अशा प्रकारची अप्राप्ताची कामना होते. परंतु ज्या भक्तांचा सांसारिक वस्तू इत्यादी प्राप्त करण्याचा उद्देशच नसतो, ते सर्वथा कामनारहित असतात.

शरीराविषयी ममता असल्याने कामना उत्पन्न होते की, माझे शरीर स्वस्थ रहावे, निरोगी रहावे, शरीर हृष्ट-पुष्ट रहावे, कमकुवत होऊ नये. यामुळेच सांसारिक धन, पदार्थ, घर इत्यादीच्या अनेक कामना उत्पन्न होतात. शरीर इत्यादी-विषयी ममता न राहिल्याने भक्तांच्या कामना समाप्त होतात.

भक्तांचा असा अनुभव असतो की, शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी आणि अहम् (मीपणा)—हे सर्व भगवंताचेच आहेत. भगवंताशिवाय त्यांचे दुसरे काहीही आपले असे नसतेच. अशा भक्तांच्या संपूर्ण कामना विशेष आणि नि:शेषरूपाने नष्ट होतात. म्हणून त्यांना येथे "**विनिवृत्तकामाः**" म्हटले गेले आहे.

## विशेष गोष्ट

वास्तविक शरीर इत्यादीचा वियोग तर प्रत्येक क्षणाला होत आहे. साधकाने प्रतिक्षण होणारा हा वियोग केवळ स्वीकार करावयाचा आहे. या वियुक्त होणाऱ्या पदार्थांशी संयोग मानल्यानेच कामना उत्पन्न होतात. जन्मापासून आज-पर्यंत आपली प्राणशक्ती निरंतर नष्ट होत आहे आणि शरीराचा प्रत्येक क्षणाला वियोग होत आहे. जेव्हा एके दिवशी शरीराचा मृत्यू होईल त्यावेळी लोक म्हणतील की, "आज हा मेला" वास्तविक पाहिले तर शरीर आज मेले नाही, तर प्रतिक्षण मरणाऱ्या शरीराचे मरणे आज समाप्त झाले आहे. म्हणून कामनापासून निवृत्त होण्यासाठी साधकाने प्रतिक्षण वियुक्त होणाऱ्या शरीर इत्यादी पदार्थांना स्थिर मानून त्यांचा आपल्याशी कधी संबंध मानू नये.

वास्तविक कामनांची कधी पूर्ती होतच नसते. जो-पर्यंत एक कामना पूर्ण होत असलेली दिसते, तोपर्यंत दुसऱ्या अनेक कामना उत्पन्न होतात. त्या कामनापैकी जेव्हा एखाद्या कामनेची पूर्ती झाल्याने मनुष्याला सुख होते, तेव्हा तो दुसऱ्या कामनांच्या पूर्तीसाठी प्रयत्न करू लागतो. परंतु हा नियम आहे की, कितीही भोग-पदार्थ मिळोत, परंतु कामनांची पूर्ती कधी होऊच शकत नाही. कामनांच्या पूर्तीच्या सुखभोगाने नव-नवीन कामना उत्पन्न होत राहतात "**जिमि प्रतिलाभ लोभ अधिकाई**" संसारातील संपूर्ण व्यक्ती, पदार्थ एकाच वेळी मिळून एका व्यक्तीच्याही कामनांची पूर्ती करू शकत नाहीत, मग सीमित पदार्थांची कामना करून सुखाची आशा करणे महान् चूकच आहे. कामना असताना कधी शांती मिळू शकत नाही—"**स शान्तिमाप्नोति न कामकामी**" (२।७०) म्हणून कामनांची निवृत्तीच परमशांतीचा उपाय आहे. म्हणून कामनांच्या पूर्तीचा प्रयत्न न करता, त्यांची निवृत्तीच केली पाहिजे.

सांसारिक भोग-पदार्थ मिळाल्याने सुख होते—ही मान्यता केल्यानेच कामना उत्पन्न होतात. ही कामना जितकी तीव्र असेल, तो पदार्थ मिळाल्यास तितकेच सुख होईल. वास्तविक कामनेच्या पूर्तीने सुख होत नाही. जेव्हा मनुष्य एखाद्या पदार्थाच्या अभावाचे दु:ख मानून कामना करून त्या पदार्थाचा मनाशी संबंध जोडतो, तेव्हा तो पदार्थ मिळाल्यावर अर्थात् त्या पदार्थाचा मनाशी संबंध-विच्छेद झाल्यावर (अभावाच्या मान्यतेचे दु:ख समाप्त झाल्यावर) सुख प्रतीत होते. जर त्याने पूर्वीपासूनच कामना केली नाही तर पदार्थ मिळाल्यावर सुख आणि न मिळाल्यास दु:ख होणारच नाही.

मूळात कामनेला सत्ताच नाही कारण जर काम्य पदार्थांनाच स्वतंत्र सत्ता नाही, तर त्याची कामना कशी राहू शकेल? म्हणून सर्व साधक निष्काम होण्यात समर्थ आहेत.

**द्वन्द्वैर्विमुक्ताः सुखदुःखसञ्ज्ञैः—**ते भक्त सुख-दु:ख, हर्ष-शोक, राग-द्वेष इत्यादी द्वन्द्वरहित होतात. कारण त्यांच्या समोर अनुकूल-प्रतिकूल जी काही परिस्थिती येत असते, त्याला ते भगवंताकडूनच दिलेला प्रसाद मानतात. त्यांची दृष्टी केवळ भगवत्कृपेवरच राहत असते, अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीवर नव्हे. म्हणून "जे काही होत आहे, ते आपल्या आवडत्या प्रभूचेच मंगलमय विधान आहे" असा भाव असल्याने त्यांचे द्वन्द्व सुगमतेने समाप्त होतात.

भगवान् सर्वांचे सुहृद आहेत "**सुहृदं सर्वभूतानाम्**" (५।२९) त्यांच्याद्वारा आपल्या अंशाचे (जीवात्मा) कधी अहित होऊच शकत नाही. त्यांच्या मंगलमय विधानाने जी काही परिस्थिती आपल्यासमोर येत असते, ती आपल्या परम हितासाठीच असते. म्हणून भक्त भगवंताच्या विधानात परम प्रसन्न राहत असतात. शरीर, इंद्रिये, मन, बुद्धीला अनुकूल प्रतिकूल परिस्थितीचे ज्ञान झाल्यावरही "अशी परिस्थिती का

आली? अशी परिस्थिती येत रहावी'' इत्यादी विकार, द्वन्द्व त्यांच्यात नसतात.

## विशेष संकेत

द्वन्द्वच (राग-द्वेषादी) विषमता आहे, ज्यापासून सर्व प्रकारची पापे उत्पन्न होतात. म्हणून विषमतेचा त्याग करण्यासाठी साधकाने नाशवान पदार्थाविषयी मानलेल्या महत्त्वाला अंतः-करणातून काढून टाकले पाहिजे. द्वन्द्वाचे दोन भेद आहेत.

**(१) स्थूल (व्यावहारिक) द्वन्द्व**—सुख-दुःख, अनुकूलता-प्रतिकूलता इत्यादी स्थूल द्वन्द्व आहेत. प्राणी सुख, अनुकूलता इत्यादीची इच्छा तर करतात, परंतु दुःख, प्रतिकूलता इत्यादीची इच्छा करीत नाहीत. हे स्थूल द्वन्द्व मनुष्य, पशू, पक्षी, वृक्ष इत्यादी सर्वांत दिसते.

**(२) सूक्ष्म (आध्यात्मिक) द्वन्द्व**—जरी आपली उपासना आणि उपास्य यांना सर्वश्रेष्ठ मानून त्याला आदर (महत्त्व) देणे आवश्यक तसेच लाभप्रद आहे. तरीही दुसऱ्यांची उपासना आणि उपास्यांना निकृष्ट समजून त्यांचे खण्डन, निंदा, इत्यादी करणे ''सूक्ष्म द्वन्द्व'' आहे, जे साधकासाठी हानिकारक आहे.

वास्तविक सर्व उपासनांचा एकमात्र उद्देश संसारापासून (जडता) सर्वथा संबंध-विच्छेद करणे आहे. साधकांची आवड, श्रद्धा-विश्वास आणि योग्यतेनुसार उपासनेत भिन्नता असते, हे असणे उचितच आहे. म्हणून साधकाने उपासनेच्या भिन्नतेवर दृष्टी न ठेवता ''उद्देशा'' च्या अभिन्नतेवरच दृष्टी ठेवली पाहिजे. दुसऱ्याच्या उपासनेला न पाहता आपल्या उपासनेत तत्परतेने मग्न राहिल्यास उपासनेसंबंधी ''सूक्ष्म द्वन्द्व'' आपोआप समाप्त होते.

गीतेत ''स्थूल द्वन्द्वा'' ला ''**मोहकलिलम्**'' (२।५२), आणि ''सूक्ष्म द्वन्द्वा'' ला ''**श्रुतिविप्रतिपन्ना**''* (२।५३) पदांनी म्हटले गेले आहे. साधकाच्या अंतःकरणात जोपर्यंत संसाराचा (जडता) संबंध अथवा महत्त्व राहते तोपर्यंत ही द्वन्द्व राहत असतात. ''स्थूल द्वन्द्व'' संसाराला विशेषरूपाने सत्ता आणि महत्ता देत असते. म्हणून स्थूल द्वन्द्वांना समाप्त करणे फार आवश्यक आहे.

जोपर्यंत मूढता राहत असते तोपर्यंत द्वन्द्व राहत असतात. वास्तविक पाहिले तर आपल्यात द्वन्द्व मानणेच मूढता आहे. राग-द्वेष, सुख-दुःख, हर्ष-शोक इत्यादी द्वन्द्व अंतःकरणात होत असतात; स्वमध्ये (आपल्या स्वरूपात) नव्हे. अंतःकरण जड आहे आणि ''स्व'' चेतन आणि जडाचे प्रकाशक आहे. म्हणून अंतःकरणाचा स्व शी संबंध नाहीच केवळ मान्यतेनेच हा संबंध प्रतीत होतो.

सुख-दुःखादी द्वन्द्व आले असताना आपण तर तेच राहतो असा सर्वांचा अनुभव आहे. असे तर होत नाही की, सुख मिळाले तर आपण दुसरेच कोणी होतो व दुःख आल्यास कोणी तिसरे! परंतु मूढतेने या सुख-दुःखाशी मिसळून सुखी आणि दुःखी होऊ लागतो. जर आपण या येणाऱ्या जाणाऱ्याशी न मिसळता आपल्या स्वरूपात स्थित (स्वस्थ) राहिलो, तर सुख-दुःखादी द्वन्द्वापासून आपोआप रहित होऊन जाऊ. म्हणून साधकाने बदलणाऱ्या अर्थात् येणाऱ्या-जाणाऱ्या अवस्थेवर (सुख-दुःख, हर्ष-शोकादी) दृष्टी न ठेवता कधीच न बदलणाऱ्या आपल्या स्वरूपावरच दृष्टी ठेवली पाहिजे, जे सर्वथा अवस्थातीत आहे.

गीतेत भगवंतांनी राग-द्वेष इत्यादी द्वन्द्वापासून मुक्त होण्याचा फारच सोपा उपाय सांगितला आहे की, अनुकूलता-प्रतिकूलता ह्यात राग-द्वेष लपलेले असतात. त्यांच्यापासून सुटका करून घेण्यासाठी साधकांनी केवळ इतकीच सावधानी ठेवावी की, त्यांनी यांच्या वशीभूत होऊ नये. (३।३४) तात्पर्य, राग-द्वेष दिसून आले तरीही साधकाने यांना वश होऊन त्यानुसार क्रिया करू नये, कारण क्रिया केल्यानेच हे पुष्ट होत असतात.

**गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत्**—येणारे-जाणारे पदार्थ प्राप्त करण्याची इच्छा अथवा त्यासाठी प्रयत्न करणे तसेच त्यांच्यापासून सुखी-दुःखी होणे ''मूढता'' आहे. वास्तविक संसार निरंतर परिवर्तनशील आहे आणि परमात्मा नित्य राहणारा आहे. परमात्म्याच्या सत्तेनेच संसाराची सत्ता दिसत असते, परंतु अविनाशी परमात्मा आणि विनाशी संसाराच्या सत्तेला मिसळून ''संसार आहे'' असे समजणे ''मूढता'' आहे.

ज्याप्रमाणे मूढ (अज्ञानी) मनुष्यांना ''संसार आहे'' असे स्पष्ट दिसत असते, त्याचप्रमाणे अमूढ (मोहरहित) भक्तांना ''परमात्मा आहे'' असा स्पष्ट अनुभव येतो. संसार जसा दिसतो तसाच आहे, अशा प्रकाराने संसाराला स्थायी मानणे मूढता (मोह) आहे. ज्यांची ही मूढता समाप्त झाली, त्या भक्तांना येथे ''**अमूढाः**'' म्हटले गेले आहे. मूढता समाप्त झाल्यानंतर सुख-दुःखाचा परिणाम होत नाही. ज्याच्यावर सुख-दुःख इत्यादी द्वन्द्वाचा परिणाम होत नाही, तो

---

* ''श्रुतिविप्रतिपन्न'' चा अर्थ, शास्त्रांमध्ये ज्ञान, कर्म आणि भक्ती; द्वैत, अद्वैत, शुद्धाद्वैत, द्वैताद्वैत इत्यादी सिद्धांत; विष्णू, राम, कृष्ण, शिव, शक्ती, गणेश, इत्यादी उपास्य देव; सकाम आणि निष्कामभाव इत्यादी भिन्न भिन्न विचारांकडे पाहून कोणत्याही एका विचारावर आपला निश्चय अथवा निर्णय करू न शकणे अर्थात् किंकर्तव्यविमूढ होणे हा आहे.

मुक्तीचा पात्र असतो. (२।१५) म्हणूनच या श्लोकात भगवंतांनी दोन वेळा मूढतेच्या त्यागाविषयी (''**निर्मानमोहाः**'' आणि ''**अमूढाः**'') सांगून मूढतेच्या त्यागावर विशेष भर दिला आहे.

मूढता अर्थात् मोह दोन प्रकारचा असतो (१) परमात्म्याकडे अग्रेसर न होता केवळ संसारातच व्यस्त राहणे आणि (२) परमात्म्याला योग्य रीतीने न जाणणे. या श्लोकात प्रथम ''**निर्मानमोहाः**'' पदाने संसाराचा मोह समाप्त करण्याविषयी म्हटले आहे आणि येथे ''**अमूढाः**'' *पदाने परमात्म्याला योग्य रीतीने जाणून घेण्याविषयी म्हटले आहे.

ज्या परमात्म्याला या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात ''**उर्ध्वमूलम्**'' पदाने म्हटले गेले आहे तसेच ज्या परमपदरूपी परमात्म्याचा शोध करण्यासाठी चौथ्या श्लोकात प्रेरणा केली गेली आहे आणि पुढे सहाव्या श्लोकात ज्याच्या महिमेचे वर्णन करतील, त्याच परमात्मरूपी परमपदाला येथे ''**अव्ययम् पदम्**'' म्हटले आहे. जे उच्च स्थितीचे साधक भक्त मान, मोह, ममता इत्यादी दोषांनी सर्वथा रहित होतात, ते त्या अविनाशी परमपदाला अवश्य प्राप्त होतात, जे प्राप्त झाल्यानंतर मनुष्य पुन्हा नाशवान् संसारात परत येत नाही.

वास्तविक तर मनुष्यमात्र त्या पदाला सहजच प्राप्त आहेत, परंतु तिकडे दृष्टी नसल्याने त्यांना तसा अनुभव येत नाही. याला एका उदाहरणाने समजून घेऊ. आपण रेल्वेने यात्रा करीत आहोत. आपली गाडी एका स्टेशनवर थांबते. आपल्या गाडीच्या बाजूला (दुसऱ्या रुळावर) उभी असलेली दुसरी गाडी चालू लागते. त्यावेळी (त्या चालत्या गाडीवर दृष्टी राहिल्यास) भ्रमाने आपणाला आपली गाडी चालत असलेली दिसू लागते. परंतु जेव्हा आपण आपली दृष्टी तेथून हटवून स्टेशनकडे वळवितो तेव्हा पत्ता लागतो की आपली गाडी जशीच्या तशीच (आपल्या स्थानावर) उभी आहे. त्याचप्रमाणे संसाराशी संबंध झाल्यावर मनुष्य स्वतःला संसाराप्रमाणे क्रियाशील (येणारा-जाणारा) पाहू लागतो. परंतु जेव्हा तो संसारापासून दृष्टी हटवून आपल्या स्वरूपाकडे पाहतो, तेव्हा त्याला पत्ता लागतो की, मी स्वतः तर जसाच्या तसाच आहे.

**परिशिष्ट भाव**—ज्ञानयोग आणि कर्मयोग यांच्या अंतर्गत भक्ती येत नाही, परंतु भक्तीच्या अंतर्गत ज्ञानयोग आणि कर्मयोग दोन्ही येतात (गीता—दहाव्या अध्यायाचा दहावा-अकरावा श्लोक). म्हणून येथे '**अध्यात्मनित्याः**' पदाने ज्ञानयोग आणि '**विनिवृत्तकामाः**' पदाने कर्मयोग घेऊ शकतो.

***संबंध**—पूर्व श्लोकात वर्णित ज्या अविनाशी पदाला भक्तलोक प्राप्त होतात, ते अविनाशी पद कसे आहे त्याचे विवेचन भगवान् करीत आहेत.*

**न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः।**
**यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम॥ ६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तत्** | = त्याला (परमपदाला) | **न** | = नाही (आणि) | **न, निवर्तन्ते** | = परत (संसारात) येत नाहीत, |
| **सूर्यः ( भासयते )** | = सूर्यही प्रकाशित करू शकत | **पावकः** | = अग्नीही | | |
| | | **भासयते** | = प्रकाशित करू शकत | **तत्** | = तेच |
| **न** | = नाही, | **न** | = नाही (आणि) | **मम** | = माझे |
| **शशाङ्कः** | = चंद्रही प्रकाशित | **यत्** | = ज्याला | **परमम्** | = परम |
| **( भासयते )** | करू शकत | **गत्वा** | = प्राप्त होऊन (जीव) | **धाम** | = धाम आहे. |

***व्याख्या***—[ सहावा श्लोक पाचव्या आणि सातव्या श्लोकाला जोडणारा आहे. या श्लोकात भगवान् हे सांगत आहेत की, ते अविनाशी पद माझेच धाम आहे, जे माझ्यापासून अभिन्न आहे आणि जीवही माझा अंश असल्यामुळे माझ्याशी अभिन्न आहे. म्हणून जीवाची देखील त्या धामाशी (अविनाशी) अभिन्नता आहे अर्थात् तो त्या धामाला नित्यप्राप्त आहे.

जरी या सहाव्या श्लोकाचा बाराव्या श्लोकाशी घनिष्ठ संबंध आहे, तरीही पाचव्या आणि सातव्या श्लोकाला जोडण्यासाठी याला इथे दिले गेले आहे. या श्लोकात भगवंतांनी दोन मुख्य गोष्टी सांगितल्या आहेत (१) त्या धामाला सूर्यादी प्रकाशित करू शकत नाहीत. (ज्याचे कारण-रूपाने विवेचन भगवंतांनी याच अध्यायाच्या बाराव्या श्लोकात

* जसे निर्गुण तत्त्वाला जाणणारा अमूढ (मोहरहित) होतो (५।२०), तसेच सगुण साकाराला दृढतापूर्वक मानणाराही अमूढ होतो (१०।३, १५।१९)

करतील) आणि (२) त्या धामाला प्राप्त झालेले जीव पुन्हा संसारात परत येत नाहीत. (ज्याचे कारणरूपाने विवेचन भगवंतांनी याच अध्यायाच्या सातव्या श्लोकात करणार आहेत)]

**न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः—**दृश्य जगात सूर्यासारखी तेजस्वी, प्रकाशस्वरूप कोणतीही वस्तू नाही. तो सूर्यही त्या परमधामाला प्रकाशित करण्यास असमर्थ आहे, मग सूर्यापासून प्रकाशित होणारे चंद्र आणि अग्नी त्याला प्रकाशित कसे करू शकतील? याच अध्यायाच्या बाराव्या श्लोकात भगवान् स्पष्ट सांगतील की, सूर्य, चंद्र आणि अग्नी यामध्ये माझेच तेज आहे. माझ्यापासून प्रकाश मिळवून हे भौतिक जगताला प्रकाशित करतात. म्हणून जे त्या परमात्मतत्त्वापासून प्रकाश मिळवितात, त्यांच्याकडून परमात्मस्वरूप असलेले परमधाम कसे प्रकाशित होऊ शकते? *तात्पर्य परमात्मतत्त्व चेतन आहे आणि सूर्य, चंद्र आणि अग्नी जड (प्राकृत) आहेत. हे सूर्य, चंद्र आणि अग्नी क्रमाने नेत्र, मन आणि वाणीला प्रकाशित करतात. हे तिन्हीही (नेत्र, मन आणि वाणी) जड आहेत. म्हणून नेत्रांनी परमात्मतत्त्व पाहिले जाऊ शकत नाही, मनाने त्याचे चिंतन केले जाऊ शकत नाही आणि वाणीने त्याचे वर्णन केले जाऊ शकत नाही. कारण जड तत्त्वाने चेतन परमात्मतत्त्वाची अनुभूती होऊ शकत नाही. ते चेतन (प्रकाशक) तत्त्व या सर्व प्रकाशित पदार्थांमध्ये सदा परिपूर्ण आहे. त्या तत्त्वात स्वतःच्या प्रकाशकतेचा अभिमान नसतो.

चेतन जीवात्माही परमात्म्याचाच अंश असल्याने स्वतः प्रकाशस्वरूप आहे. म्हणून त्यालाही जड पदार्थ (मन, बुद्धी इंद्रिये इत्यादी) प्रकाशित करू शकत नाहीत. मन, बुद्धि, इंद्रिये इत्यादी जड पदार्थांचा उपयोग (भगवंताच्या नात्याने दुसऱ्यांची सेवा करून) केवळ जडतेशी संबंध-विच्छेद करण्यातच आहे.

एक गोष्ट लक्षात ठेवण्याची अशी आहे की, येथे सूर्याला भगवान् अथवा देव या दृष्टीने न पाहता केवळ प्रकाश करणाऱ्या पदार्थांच्या दृष्टीनेच म्हटले गेले आहे. तात्पर्य, सूर्य तैजस तत्त्वामध्ये श्रेष्ठ आहे म्हणून येथे केवळ सूर्याचा उल्लेख नाही, तर चंद्र, अग्नी इत्यादी सर्वच तैजस तत्त्वांचा उल्लेख आला आहे. जसे दहाव्या अध्यायाच्या सदतीसाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, ''वृष्णिवंशीयांमध्ये मी वासुदेव आहे'' (१०।३७), तर तेथे ''वासुदेवा'' चे भगवंताच्या रूपात वर्णन नाही, तर वृष्णिवंशाच्या श्रेष्ठ पुरुषाच्या रूपानेच वर्णन आहे.

**यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम—**जीव परमात्म्याचा अंश आहे. तो जोपर्यंत आपल्या अंशी परमात्म्याला प्राप्त करून घेत नाही तोपर्यंत त्याचे आवागमन समाप्त होऊ शकत नाही. जसे नदीच्या पाण्याला आपल्या अंशी समुद्राला मिळाल्यावरच स्थिरता प्राप्त होते, तसे जीवाला आपल्या अंशी परमात्म्याला मिळाल्यावरच वास्तविक, स्थायी शांती मिळत असते. वास्तविक जीव परमात्म्याशी अभिन्न आहेच, परंतु संसाराच्या (मानलेल्या) संगामुळे त्याला उच्च, नीच योनीमध्ये जावे लागते.

येथे ''परमधाम'' शब्द परमात्म्याचे धाम आणि परमात्मा—दोहोंचाही वाचक आहे. हे परमधाम प्रकाशस्वरूप आहे. जसे सूर्य आपल्या विशिष्ट स्थानावरदेखील स्थित आहे आणि प्रकाशरूपाने सर्व ठिकाणीही स्थित आहे. अर्थात् सूर्य आणि त्याचा प्रकाश परस्पर अभिन्न आहे. त्याचप्रमाणे परमधाम आणि सर्वव्यापी परमात्मासुद्धा परस्पर अभिन्न आहेत.

भक्तांच्या भिन्न भिन्न मान्यतांमुळे ब्रह्मलोक, साकेत धाम, गोलोक धाम, देवीद्वीप, शिवलोक इत्यादी एकाच परमधामाची भिन्न भिन्न नावे आहेत. हे परमधाम; चेतन, ज्ञानस्वरूप, प्रकाशस्वरूप आणि परमात्मस्वरूप आहे.

हे अविनाशी परमपद आत्मरूपाने सर्वात समानरूपाने अनुस्यूत (व्याप्त) आहे. म्हणून स्वरूपाने आपण त्या परमपदात स्थित आहोतच, परंतु जडतेशी (शरीर इत्यादी) असलेले तादात्म्य, ममता आणि कामना यांच्यामुळे आपणाला त्याची प्राप्ती अथवा त्यात आपल्या स्वाभाविक स्थितीचा अनुभव येत नाही.

**परिशिष्ट भाव—**आपण भगवंताचे अंश आहेत—**'ममैवांशो जीवलोके'** (गीता १५।७)। म्हणून भगवंताचे जे धाम आहे, तेच आपले धाम आहे, त्यामुळेच त्या धामाची प्राप्ती झाल्यास पुन्हा परत संसारात जन्मावे लागत नाही. जोपर्यंत

---

* न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः।
तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति॥
(कठोपनिषद् २।२।१५, मुण्डकोपनिषद् २।२।१०, श्वेताश्वतरोपनिषद् ६।१४)

''त्या परमात्म्याला सूर्य प्रकाशित करीत नाही, चंद्र आणि तारे प्रकाशित करीत नाहीत, विद्युतही प्रकाशित करीत नाही, मग हा अग्नी त्याला कसा प्रकाशित करू शकेल ? हे संपूर्ण जगत् त्या परमात्म्याच्या प्रकाशानेच प्रकाशित होते''

(२) ''जगत प्रकास्य प्रकासक रामू।'' (मानस १।११७।४)

आपण आपल्या त्या धामात जाणार नाही, तोपर्यंत आपण प्रवाशासारखे अनेक योनीत आणि अनेक लोकांत फिरतच राहू, कुठेही थांबू शकणार नाही, आपण उच्चाती उच्च ब्रह्मलोकात जरी गेलो तरी तेथूनही परत यावे लागेल—**'आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन'** (गीता ८। १६). कारण हा संपूर्ण संसार (संपूर्ण ब्रह्मांड) परदेश आहे, स्वदेश नव्हे. हे दुसऱ्याचे घर आहे, आपले घर नव्हे. भिन्न-भिन्न योनीत आणि लोकांत आपले फिरणे, भटकणे तेव्हाच बंद होईल, जेव्हा आपण आपल्या वास्तविक घरी पोहचू.

परमपदाला प्राप्त होऊन पुन्हा परत संसारात न येण्याची गोष्ट गीतेत तीन जागी सांगितली गेली आहे—

(१) **यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम।** (८। २१).

(२) **ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः।** (१५। ४).

(३) **यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम्।** (१५। ६).

भगवंताने ज्ञानमार्गात तर अपुनरावृत्तीची प्राप्ती सांगितली आहे—**'गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः'** (गीता ५। १७), परंतु भक्तिमार्गात आपल्या धामाची प्राप्ती सांगितली आहे—ही भक्तीची विशेषता आहे! भगवंताच्या धामात प्रेमाचे विशेष आस्वादन प्राप्त होते.

परमपदाला आधिभौतिक प्रकाशही (सूर्य, चंद्र इत्यादीही) प्रकाशित करू शकत नाही आणि आधिदैविक प्रकाशही (नेत्र, मन, बुद्धी, वाणी इत्यादीही) प्रकाशित करू शकत नाही. कारण हे स्वयंप्रकाश आहे. यात प्रकाश्य-प्रकाशक याचा भेद नाही.

**'गत्वा'** यात गती आहे, प्रवृत्ती नाही. कारण अंशाची अंशीकडे गती असते, प्रवृत्ती नाही. प्रवृत्ती तर परतः होते, परंतु गती स्वाभाविक होते.

**गती आणि प्रवृत्ती—**गती स्वतः स्वाभाविक होते आणि त्यात परिश्रम (प्रयत्न), उद्योग आणि कर्तृत्व नसते. परंतु प्रवृत्ती अस्वाभाविक, श्रमसाध्य, उद्योगसाध्य आणि कर्तृत्वसहित असते. प्रवृत्ती तर अहंकारयुक्त झाल्याने होते, परंतु गती अहंकाररहित झाल्याने होते. म्हणून गती 'स्व' कडे होते आणि प्रवृत्ती 'पर' कडे होते. गती परमात्म्याकडे होते आणि प्रवृत्ती संसाराकडे होते. गती चिन्मयतेकडे होते आणि प्रवृत्ती जडतेकडे होते. गती असीमकडे घेऊन जाते आणि प्रवृत्ती सीमितकडे घेऊन जाते. गती स्वाधीन करते आणि प्रवृत्ती पराधीन करते. भोग आणि संग्रह यांचे सुख इच्छिल्यास प्रवृत्ती होते आणि दुसऱ्याला सुख दिल्याने गती होते.

गतीचे उद्गम-स्थान 'सत्' आहे आणि प्रवृत्तीचे उद्गम स्थान 'असत्' आहे. जसे गंगेचे उद्गम-स्थान गंगोत्री आहे. जर गंगेला रोखून एक असा बांध बांधला गेला ज्याची उंची गंगोत्रीपेक्षाही उंच असेल तर गंगाजल आपोआप आपल्या उद्गम-स्थानाकडे, गंगोत्रीकडे जाईल. अशाप्रकारे गंगेचे आपल्या उद्गम-स्थानाकडे जाणे 'गती' आहे. म्हणून गती दोन प्रकाराने होते—संसाराकडे (भोग आणि संग्रहाकडे) जाणे बंद करण्याने अर्थात् त्यापासून विमुख होण्याने अथवा आपला उद्देश-परमात्मा त्याच्याकडे जाण्याने अर्थात् त्यांच्या सन्मुख होण्याने, नित्यप्राप्त परमात्म्याची जी अप्राप्ती मानली गेली आहे, तिचे मिटणे हीच परमात्म्याकडे गती होणे आहे. गतीत परमात्म्याशी मानलेले दूरत्व समाप्त होते आणि वास्तविक ऐक्य प्रकट होते.

साधकाला असा अनुभव येतो की, कित्येक वर्षापूर्वी जसे भाव आणि आचरण होते, तसे आता राहिले नाही, तर पूर्वीपेक्षा अधिक श्रेष्ठ झाले, तर ही साधकाची गती झाली. साधनावस्थेत जी गती असते, त्यात अहम्चा सूक्ष्म संस्कार राहू शकतो, परंतु मुक्त झाल्यावर प्रतिक्षण वर्धमान प्रेमाकडे जी गती होते, त्यात अहम्चा सूक्ष्म संस्कारही राहत नाही अर्थात् अहम्चा अत्यंत अभाव होतो. याचे कारण असे आहे की, जीव परमात्म्यापासून जितका दूर असतो, तितकाच त्यात अहंकार राहतो. स्वरूपात स्थित झाल्यावरही सूक्ष्म अहंकार राहतो, जो मुक्तीत तर बाधक होत नाही, परंतु इतर दार्शनिकांशी मतभेद करणारा असतो. परमात्म्याशी अभिन्नता झाल्यास अहंकार संपूर्णपणे समाप्त होतो.

***संबंध***—*पूर्व श्लोकात भगवंतांनी आपल्या परमधामाचे वर्णन करीत असताना हे सांगितले की, त्याला प्राप्त होऊन जीव पुन्हा संसारात परत येत नाही. त्या विवेचनात आपला अंश जीवात्म्यालाही (परमधामाप्रमाणे) आपल्याशी अभिन्न असल्याचे सांगून जीवाच्या कोणत्या चुकीमुळे त्या नित्यप्राप्त परमात्मस्वरूपी परमधामाचा अनुभव येत नाही याचे हेतुसहित वर्णन पुढील श्लोकात करतात.*

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः।**
**मनःषष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति॥ ७॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **जीवलोके** | = या संसारात | **सनातनः** | = सतानत | **मनःषष्ठानि** | = मन आणि पाचही |
| **जीवभूतः** | = जीव बनलेला आत्मा (स्वयं) | **अंशः** | = अंश आहे, (परंतु तो) | **इन्द्रियाणि** | = इंद्रियांना |
| **मम, एव** | = माझाच | **प्रकृतिस्थानि** | = प्रकृतीत स्थित असलेल्या | **कर्षति** | = आकर्षित करतो (आपले मानतो). |

*व्याख्या*— **ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः—** ज्यांच्याशी जीवाची तात्त्विक अथवा स्वरूपाची एकता नाही, अशा प्रकृती आणि प्रकृतीच्या सर्व कार्याचे नाव "लोक" आहे. तीन लोक, चौदा भुवनामध्ये जीव जितक्या योनीत शरीर धारण करतो, त्या संपूर्ण लोक तसेच योनींना "**जीवलोके**" पदाच्या अंतर्गत समजावे.

आत्मा परमात्म्याचा अंश आहे, परंतु प्रकृतीचे कार्य शरीर, इंद्रिये, प्राण, मन इत्यादीशी आपली एकता मानून तो "जीव" झाला आहे—"**जीवभूतः**" त्याचा हा जीवपणा कृत्रिम आहे, वास्तविक नाही. नाटकात एखादे पात्र बनण्या-प्रमाणेच हा आत्मा जीवलोकात "जीव" बनतो.

सातव्या अध्यायात भगवंतांनी म्हटले आहे की, या संपूर्ण जगताला माझ्या "जीवभूता" परा-प्रकृतीने धारण केले आहे (७।५) अर्थात् अपरा-प्रकृती (संसार) शी वास्तविक संबंध नसतानाही जीवाने त्याच्याशी आपला संबंध मानला आहे.

भगवान् जीवाविषयी किती आत्मीयता ठेवतात की, त्याला आपलेच मानतात—"**ममैवांशः**" केवळ मानतच नाहीत तर जाणतही असतात. त्यांची ही आत्मीयता महान् हितकारी, अखंड राहणारी आणि स्वतःसिद्ध आहे.

येथे भगवान् ही वास्तविकता प्रगट करीत आहेत की, जीव केवळ माझाच आहे, यात प्रकृतीचा किंचिन्मात्रही अंश नाही. जसे सिंहाचा बच्चा मेंढरात मिसळून आपणाला मेंढरू मानतो, तसेच हा जीव शरीरादी जड पदार्थाशी मिसळून आपल्या खऱ्या चेतन स्वरूपाला विसरून जातो. म्हणून या विस्मृतीला नाहीशी करून त्याने स्वतः सदा सर्वदा चेतन स्वरूपाचाच अनुभव केला पाहिजे. सिंहाचा बच्चा मेंढरात मिसळला तरी मेंढरू होत नाही. जसे कोणी दुसऱ्या सिंहाने येऊन त्याला बोध केला की, "पहा, तुझी व माझी आकृती, स्वभाव, जाती, गर्जना इत्यादी सर्व काही एकसारखे आहे. म्हणून तू खात्रीने मेंढरू नसून माझ्यासारखा सिंहच आहेस." तसेच भगवान् येथे "**मम एव**" पदांनी जीवाला बोध करतात की, 'हे जीव! तू माझाच अंश आहेस. प्रकृतीशी तुझा कधी संबंध झाला नाही, आता नाही, होणार नाही आणि होऊ शकतही नाही.'

भगवत्प्राप्तीच्या सर्व साधनांमध्ये अहंता (मी पणा) आणि ममता (माझेपणा) यांचे परिवर्तनरूपी साधन फारच सोपे आणि श्रेष्ठ आहे. अहंता आणि ममता—दोन्हीत साधकाची जशी मान्यता असते, त्यानुसार त्याचा स्वभाव तशीच क्रियाही आपोआप होत असते. साधकाची "अहंता" अशी असावयास पाहिजे की, "मी भगवंताचाच आहे" आणि "ममता" अशी असली पाहिजे की, "भगवंतच माझे आहेत".

सर्वांचा असा अनुभव आहे की, आपण स्वतःला ज्या वर्ण, आश्रम, सांप्रदाय इत्यादीचा मानतो, त्यानुसारच आपले जीवन बनते. परंतु ही मान्यता (जसे मी ब्राह्मण आहे, मी साधू आहे इत्यादी) केवळ (नाटकातील पात्राप्रमाणे) कर्तव्य पालनासाठी आहे. कारण ही मान्यता सदा राहणारी नाही. परंतु "मी भगवंताचा आहे" ही वास्तविकता सदा राहणारी आहे. "मी ब्राह्मण आहे, मी साधू आहे" इत्यादी भाव कधी आपणाला असे म्हणत नाहीत की, "तुम्ही ब्राह्मण आहात" अथवा "तुम्ही साधू आहात". त्याचप्रमाणे मन, बुद्धी, इंद्रिये, शरीर, धन, जमीन, घर इत्यादी ज्या पदार्थांना आपण चुकीने आपले मानत आहोत, ते कधीही आपल्याला असे म्हणत नाहीत की, तुम्ही आमचे आहात, परंतु संपूर्ण सृष्टीचे रचयिते परमात्मा स्पष्ट घोषणा करीत आहेत की, "जीव माझाच आहे".

विचार केला पाहिजे की, शरीरादी पदार्थांना आपण आपल्याबरोबर आणले नाही, इच्छेप्रमाणे त्यांच्यात परिवर्तन करू शकत नाही, इच्छेनुसार त्यांना आपल्याजवळ स्थिर ठेवू शकत नाही, आपणही त्यांच्याबरोबर सदा राहू शकत नाही, त्यांना आपल्याबरोबर घेऊन जाऊ शकत नाही, तरीही त्यांना आपले मानत असतो—ही आमची केवढी मोठी चूक आहे.

लहानपणी आपले मन, बुद्धी, इंद्रिये, शरीर, जसे होते, तसे आता नाही, सर्वचे सर्व बदलून गेले आहे तरीही आपण "मी जो लहानपणी होतो तोच मी आता आहे" असे मानतो. कारण शरीरादीत परिवर्तन झाले तरीही आपल्यात परिवर्तन झाले नाही. अशा प्रकारे आपणाला शरीरादीत स्पष्ट परिवर्तन दिसते. ज्याला परिवर्तन दिसते तो स्वतः परिवर्तन रहित असतो. म्हणून संसारातील पदार्थ, व्यक्ती आपले साथी नाहीत.

"मी भगवंताचा आहे"—असा भाव ठेवणे आपण

स्वत:ला भगवंतात विलीन करणे आहे. साधकांकडून ही चूक होत असते की, ते स्वत:ला भगवंतात विलीन न करता, मन-बुद्धीला भगवंतात विलीन करण्याचा प्रयत्न करतात. ''मी भगवंताचा आहे'' या वास्तविकतेला विसरून ''मी ब्राह्मण आहे, मी साधू आहे'' इत्यादीही मानत राहिले आणि मन-बुद्धीला भगवंतात विलीन करीत राहिले, तर ही द्विधा-वृत्ती कधी नाहीशी होणार नाही आणि पुष्कळ प्रयत्न करूनही मन-बुद्धी जशी भगवंतात विलीन व्हावयास पाहिजेत तशी विलीन होणार नाहीत. भगवंतांनीही या अध्यायाच्या चौथ्या श्लोकात ''मी त्या परमात्म्याला शरण आहे'' पदांनी आपल्या स्वत:ला परमात्म्याचे ठिकाणी विलीन करण्याविषयी म्हटले आहे. गोस्वामी तुलसीदासजीही म्हणतात की, प्रथम भगवंताचे होऊन मग नाम जप इत्यादी साधन कराल तर अनेक जन्मांपासून बिघडलेली स्थिती आज, आत्ता सुधारू शकते.

**बिगरी जनम अनेक की सुधरै अबहीं आजु।**
**होहि राम को नाम जपु तुलसी तजि कुसमाजु॥**
(दोहावली २२)

तात्पर्य भगवंतात केवळ मन-बुद्धी विलीन करण्या-पेक्षा स्वत:ला भगवंतात विलीन करणे श्रेष्ठ आहे. स्वत:ला भगवंतात विलीन करण्याने मन-बुद्धी आपोआप सुगमतेने भगवंताकडे वळतील. नाटकातील पात्र करणारा हजारो प्रेक्षकांसमोर असे म्हणतो की, ''मी रावणाचा मुलगा मेघनाद आहे'' आणि मेघनादाप्रमाणेच तो सर्व बाह्य क्रिया (अभिनय) करत असतो. परंतु त्याच्या अंत:करणात हा भाव नित्य-निरंतर राहतो की, हे तर सोंग आहे. वास्तविक मी मेघनाद नाहीच. त्याचप्रमाणे साधकांनीही नाटकातील पात्राप्रमाणे ह्या संसाररूपी नाट्य-गृहात आपापल्या कर्तव्याचे पालन करीत राहून आतून ''मी तर भगवंताचा आहे'' असा भाव नेहमी जागृत ठेवला पाहिजे.

जीव नेहमीच भगवंताचा आहे ''**सनातन:**'' भगवंतांनी कधीही जीवाचा त्याग केला नाही आणि कधीही त्याच्यापासून विमुख झाले नाहीत. जीवसुद्धा भगवंताचा त्याग करू शकत नाही. भगवंताकडून मिळालेल्या स्वतंत्रतेचा दुरुपयोग करून तो भगवंताशी विमुख झाला आहे. ज्याप्रमाणे सोन्याचा दागिना तात्त्विक दृष्टीने सोन्यापासून वेगळा होऊ शकत नाही, त्याचप्रमाणे जीवही तात्त्विक दृष्टीने परमात्म्यापासून कधीही वेगळा होऊ शकत नाही.

बुद्धिमान म्हणविणाऱ्या मनुष्याची ही फार मोठी चूक आहे की, तो आपल्या अंशी असणाऱ्या भगवंताशी विमुख होत आहे. तो इकडे लक्षच देत नाही की, भगवान् इतके सुहृद (दयाळू आणि प्रेमी) आहेत की, आपण त्यांच्याशी प्रेम न करताही ते आपल्याशी प्रेम करतात. ते किती उदार, दयाळू आणि प्रेमी आहेत—याचे वर्णन भाषा, भाव, बुद्धी इत्यादीद्वारा होऊ शकत नाही. अशा सुहृद भगवंताला सोडून इतर नाशवान जड पदार्थांना आपले समजणे ही बुद्धिमानी नसून महान मूर्खता आहे.

जर मनुष्याने भगवंताच्या आज्ञेनुसार आपल्या कर्तव्याचे पालन केले तर ते त्याची इतकी उन्नती करतात की, जीवन सफल होते आणि जन्ममरणरूप बंधन नेहमीसाठी समाप्त होते. जेव्हा मनुष्य चुकून एखादे निषिद्ध आचरण (पाप) करतो, तेव्हा ते दु:खांना पाठवून त्याला चेतावणी देतात, जुनी पापे भोगवून त्याला शुद्ध करतात आणि नवीन पापे करण्याच्या प्रवृत्तीपासून रोखतात.

जीव कुठेही का असेना, नरकात असो अथवा स्वर्गात असो, मनुष्ययोनीत असो अथवा पशुयोनीत असो, भगवान् त्याला आपलाच अंश मानतात. ही त्यांची किती अहैतुकी कृपा, उदारता, आणि महत्ता आहे. जीवाच्या पतनाला पाहून भगवान् दु:खी होऊन म्हणतात की, माझ्याजवळ येण्याचा त्याला पूर्ण अधिकार होता, परंतु तो मला प्राप्त केल्याविना (''**माम् अप्राप्य**'') नरकात जात आहे (१६।२०)

मनुष्य मग तो कोणत्याही स्थितीत का असेना, भगवान् त्याला तेथे स्थिर राहू देत नाहीत, त्याला सारखे आपलेकडे ओढतच राहतात. जेव्हा आपल्या सामान्य स्थितीत जे काही परिवर्तन (सुख-दु:ख, आदर-निरादर इत्यादी) होते, तेव्हा हे मानले पाहिजे की, भगवान् आपल्याला विशेषरूपाने आठवण ठेवून नवीन परिस्थिती निर्माण करीत आहेत, आपणाला त्यांच्याकडे ओढत आहेत. असे समजून साधकाने प्रत्येक परिस्थितीत विशेष भगवत्कृपा समजून मस्त रहावे आणि भगवंताला कधी विसरू नये.

अंशीला प्राप्त करण्यात अंशाला कठीणता आणि वेळ लागत नाही. कठीणता आणि वेळ यामुळे लागतो की, अंशाने आपल्या अंशीपासून विमुखता मानून त्या शरीरादीला आपले समजले आहे, जे आपले नाहीत. म्हणून भगवंताला सम्मुख होताच त्यांची प्राप्ती स्वत:सिद्ध आहे. सम्मुख होणे जीवाचे काम आहे कारण जीवच भगवंतापासून विमुख झाला आहे. भगवंत तर जीवाला आपले मानतातच, जीवाने भगवंताला आपले मानावे हीच सम्मुखता आहे.

मनुष्याकडून ही फार मोठी चूक होऊ लागली आहे

की, जी व्यक्ती, वस्तू, परिस्थिती आत्ता नाही अथवा ज्याच्या प्राप्तीची निश्चिती नाही आणि जी प्राप्त झाली तरी ती नेहमी राहणार नाही—त्याच्या प्राप्तीत आपला पूर्ण पुरुषार्थ आणि आपली उन्नती मानतो. हा मनुष्याचा स्वत:साठी फार मोठा धोका आहे. वास्तविक जे नित्यप्राप्त आणि आपले आहे, त्या परमात्म्याला प्राप्त करणे हाच मनुष्याचा परम पुरुषार्थ आहे, शूरवीरता आहे . आपण धन, संपत्ती इत्यादी सांसारिक पदार्थ कितीही प्राप्त करून घेतले तरी शेवटी ते राहणार नाहीत अथवा आपण राहणार नाहीत. शेवटी "नाही" च शिल्लक राहील. वास्तविक जे नेहमी "आहे" त्याला (अविनाशी परमात्मा) प्राप्त करून घेण्यातच शूरवीरता आहे. जे "नाही" त्याला प्राप्त करून घेण्यात कोणतीही शूरवीरता नाही.

जीव जितका नाशवान् पदार्थांना महत्त्व देतो, तितकाच तो पतनाकडे जातो आणि जितका अविनाशी परमात्म्याला महत्त्व देतो, तितकाच तो उच्च स्थितीला प्राप्त होतो. कारण जीव परमात्म्याचाच अंश आहे.

नाशवान् सांसारिक पदार्थांना प्राप्त करून मनुष्य कधीही उन्नत होऊ शकत नाही. केवळ उन्नत होण्याचा भ्रम अथवा धोका होतो आणि वास्तविक उन्नतीपासून (परमात्मप्राप्ती) वंचित होतो. नाशवान् पदार्थांच्या संबंधाने मानलेली उन्नती कधी टिकत नाही आणि परमात्म्याच्या संबंधाने झालेली उन्नती कधी समाप्त होत नाही. म्हणून जीव ज्याचा अंश आहे, त्या सर्वोपरी परमात्म्याला प्राप्त केल्यानेच तो मुक्त होतो. तो इतका मोठा (उन्नत) होतो की, देवतालोकेही त्याचा आदर करतात आणि कामना करतात की, त्याने आमच्या लोकात यावे. एवढेच नव्हे, तर स्वत: भगवान्‌ही त्याच्या अधीन होतात.

**मनः षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति**—भगवंतांनी जसे ह्या श्लोकाच्या पूर्वार्धात जीवाला आपल्यात स्थित न मानता त्याला आपला अंश मानले आहे, तसेच श्लोकाच्या उत्तरार्धात मन तसेच इंद्रियांना प्रकृतीचा अंश न म्हणता त्यांना प्रकृतीत स्थित म्हटले आहे. तात्पर्य, भगवंताचा अंश जीव नेहमी भगवंतातच स्थित आहे आणि प्रकृतीत स्थित असलेले मन तसेच इंद्रिये प्रकृतीचेच अंश आहेत. मन आणि इद्रियांना आपले मानणे, त्यांच्याशी आपला संबंध मानणे हेच त्यांना आकर्षित करणे आहे.

येथे बुद्धीचा अंतर्भाव "मन" शब्दात (जे अंत:-करणाचे उपलक्षण आहे) आणि पाच कर्मेंद्रिय तसेच पाच प्राणांचा अंतर्भाव "इंद्रिय" शब्दात समजावा. उपर्युक्त पदांत भगवान् म्हणतात की, माझा अंश जीव माझ्यात स्थित असूनही तो अज्ञानाने आपली स्थिती शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी ह्यात मानतो. जसे शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी प्रकृतीचे अंश असल्याने कधीही प्रकृतीपासून वेगळे होत नाहीत, तसेच जीवसुद्धा माझा अंश असून कधीही माझ्यापासून वेगळा होत नाही, होऊ शकत नाही, परंतु हा जीव माझ्यापासून विमुख होऊन मला विसरून गेला आहे.

येथे मन आणि पाच ज्ञानेंद्रियाचे नाव घेण्याचे तात्पर्य असे आहे की, या सहाशी संबंध जोडूनच जीव बांधला जातो. म्हणून साधकाने शरीर, इंद्रिये, मन, बुद्धीला संसारास अर्पण करून टाकावे अर्थात् संसाराच्या सेवेत उपयोगात आणावे आणि स्वत: आपल्याला भगवंतास अर्पण करून टाकावे.

## विशेष विचार

(१) मनुष्य अज्ञानाने शरीर, स्त्री, पुत्र, धन, घर, मान, सन्मान इत्यादी नाशवान् वस्तूंना आपली आणि आपल्यासाठी समजून दु:खी होत असतो. यापेक्षाही निकृष्ट गोष्ट अशी आहे की, या सामुग्रीच्या भोग आणि संग्रहाच्या अनुषंगाने तो आपल्याला मोठा समजू लागाते. परंतु वास्तविक यांना आपले समजताच तो यांचा गुलाम होतो. आपल्याला कळो अथवा न कळो आपण ज्या पदार्थाची आवश्यकता समजतो, ज्यात काही विशेषता आणि महत्त्व पाहतो, अथवा ज्या वस्तूचे आपण गरजू आहोत, ते (धन, विद्या इत्यादी) पदार्थ आपल्यापेक्षा श्रेष्ठ आणि आपण त्यापेक्षा तुच्छ होतोच. पदार्थाच्या प्राप्तीत जो आपले महत्त्व समजतो, तो वास्तविक तुच्छच आहे मग त्याला पदार्थ मिळोत अथवा न मिळोत.

भगवंताचा दास झाल्यास भगवान् म्हणतात "**मै तो हूँ भगतनका दास, भगत मेरे मुकुटमणि**" परंतु ज्यांचे आम्ही दास बनलेले आहोत, ते धनादी जड पदार्थ कधी असे म्हणत नाहीत "**लोभी मेरे मुकुटमणी**". ते तर केवळ आपणास आपला दास बनवितात. वास्तविक भगवंताला आपले जाणून घेऊन शरण झाल्यानेच मनुष्य श्रेष्ठ होतो, उन्नत होतो. इतकेच नव्हे, भगवान् अशा भक्तांना आपल्यापेक्षाही श्रेष्ठ मानतात आणि म्हणतात—

> **अहं भक्तपराधीनो ह्यस्वतंत्र इव द्विज।**
> **साधुभिर्ग्रस्तहृदयो भक्तैर्भक्तजनप्रियः॥**
>
> (श्रीमद्भा० ९।४।६३)

"हे द्विज, मी भक्तांच्या पराधीन आहे, स्वतंत्र नाही. भक्तजन मला अत्यंत आवडते आहेत. माझ्या हृदयावर त्यांचा पूर्ण अधिकार आहे" कोणतीही सांसारिक व्यक्ती, पदार्थ

आपणास इतके मोठेपण देऊ शकते काय?

हा जीव परमात्म्याचा अंश असूनही प्रकृतीच्या अंश शरीरादींना आपले समजून स्वतः आपला अपमान करून घेतो आणि आपले पतन करून घेतो. जर मनुष्य ह्या शरीर, इंद्रिये, मन इत्यादीचा, सांसारिक पदार्थांचा दास बनला नाही, तर तो भगवंताचाही प्रिय होऊन जाईल. "**इष्टोऽसि मे दृढमिति**" (१८।६४). ज्यांनी भगवंताला प्राप्त करून घेतले आहे त्यांना भगवान् आपला प्रिय म्हणतात. (१२।१३-१९) आणि ज्यांनी भगवत्प्राप्ती करून घेतली नाही परंतु भगवत्प्राप्ती करू इच्छीतात, त्या साधकांना तर ते "अत्यंत प्रिय" समजतात "**भक्तास्तेऽतीव मे प्रियाः**" (१२।२०), अशा परम दयाळू भगवंताना, जे साधक भक्तांना "अत्यंत प्रिय" आणि सिद्ध भक्तांना केवळ "प्रिय" म्हणतात, मनुष्य आपले समजत नाही, हा त्याचा केवढा प्रमाद आहे?

(२) संसाराचा एक लहानसा अंश शरीर आहे. आणि परमात्म्याचा अंश स्वतः (जीवात्मा) आहे. चूक ही होते की, परमात्म्याचा अंश संसाराच्या अंशाशी मिसळून संसार आणि परमात्मा दोघांना आपल्या अनुकूल बनवू इच्छितो. ही चूक सुधारणे साधकाचे काम आहे. यासाठी त्याने शरीराला तर संसारानुकूल बनवावे व स्वतः परमात्म्याच्या अनुकूल बनावे. तात्पर्य, शरीराला संसारावर सोडून द्यावे की, जशी संसाराची मर्जी असेल तसेच शरीर सांभाळावे आणि स्वतः परमात्म्याला शरण व्हावे आणि परमात्म्याची जशी मर्जी असेल तसे रहावे.

संसाराची वस्तू संसाराला देऊन टाकावी आणि परमात्म्याची वस्तू परमात्म्याला देऊन टाकावी. ही ईमानदारी आहे. याच ईमानदारीचे नाव "मुक्ती" आहे. ज्याची वस्तू त्याला न देणे, संसाराची वस्तूही घेणे आणि परमात्म्याची वस्तूही घेणे, ही बेइमानी आहे. या बेईमानीचे नाव "बंधन" आहे.

संसाराची वस्तू संसारावर आणि परमात्म्याची वस्तू परमात्म्यावर सोडून देऊन निश्चिंत व्हावे. आपली कोणतीही कामना ठेऊ नये. जगण्याचीही कामना ठेवू नये आणि मरण्याचीही कामना करू नये. भगवंतांनी असे केले असते तर बरे झाले असते. पाऊस पडला असता तर चांगले झाले असते. गरमी जास्त होत आहे, थंडावा केला असता तर बरे झाले असते. महापूर येत आहेत, पाऊस कमी व्हावयास पाहिजे होता. अशा रीतीने मनुष्य भगवंतानाही आणि संसारालाही आपल्या अनुकूल बनवू इच्छितो हे सर्व सोडून आपण स्वतःला भगवंताना संपूर्णपणे अर्पित करून टाकावे आणि भगवतांना म्हणावे की, "हे नाथ! आपण मला पृथ्वीवर ठेवा, स्वर्गात ठेवा अथवा नरकात ठेवा, बालक ठेवा, तरुण ठेवा अथवा वृद्ध, अपमानित ठेवा की सम्मानित, सुखी ठेवा अथवा दुःखी, जशा परिस्थितीत ठेवू इच्छित असाल तसे ठेवा पण मला आपले विस्मरण होऊ देऊ नका."

मनुष्य ज्या घराला आपले मानतो, ज्या कुटुंबाला आपले मानतो, ज्या पैशांना आपले समजतो, त्यांचीच चिंता त्याला लागत असते. संसारात लाखांनी घरे आहेत, कोट्यावधी माणसे आहेत, अगणित धन आहे परंतु त्याची चिंता नसते कारण तो त्यांना आपले समजत नाही. ज्यांना तो आपले मानत नाही त्यांच्याविषयी तर तो मुक्त आहेच. म्हणून बरीचशी मुक्ती तर झालेलीच आहे, थोडीशीच मुक्ती होणे शिल्लक राहिले आहे.

विचार केला पाहिजे की, ज्या थोड्याशा वस्तूंना आपण आपले मानतो त्या तरी नेहमी आपल्याबरोबर राहणार आहेत का? वस्तु तर राहणार नाहीत परंतु बंधन मात्र (त्यांचा संबंध) राहील, जे जन्मजन्मांतरातही बरोबर राहील. म्हणून साधकाने शरीर संसाराला अर्पण करावे—जो कर्मयोग आहे, किंवा वाटल्यास शरीर-संसारापासून संपूर्णपणे आपल्याला वेगळे करावे, जो ज्ञानयोग आहे आणि वाटल्यास स्वतःला भगवंताना अर्पण करावे, जो भक्तियोग आहे. या तिन्हीपैकी कोणतेही एक साधन स्वीकारावे. या तिन्हींचे फल एकच आहे.

**परिशिष्ट भाव**—येथे भगवंताने ज्याला आपला अंश म्हटले आहे त्यालाच गीतेच्या सातव्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात आपली 'परा-प्रकृती' म्हटले आहे. म्हणून दोन्हीही ठिकाणी 'जीवभूत' (जीव बनलेला) शब्द आला आहे—'**जीवभूतः**', '**जीवभूताम्**'. परा आणि अपरा—दोन्ही भगवंताच्या शक्ती आहेत (गीता—सातव्या अध्यायाचा चवथा-पाचवा श्लोक). जेव्हापासून परा हिची दृष्टी भगवंतापासून हटून अपरा हिच्याकडे वळली, तेव्हापासून परा जन्म-मरणाच्या चक्रात सापडली. हीच गोष्ट सातव्या अध्यायात '**ययेदं धार्यते जगत्**' पदांने आणि येथे '**मनःषष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति**' पदांने सांगितली गेली आहे.

जरी अपराही भगवंताची आहे तरी तिचा स्वभाव वेगळा (परिवर्तनशील) आहे. म्हणून भगवंताने स्वतःला अपराहून अतीत म्हटले आहे—'**यस्मात्क्षरमतीतोऽहम्**' (गीता १५।१८). परंतु परा आणि भगवान् एका स्वभावाचे (अपरिवर्तनशील) आहेत. म्हणून '**ममैवांशः**' पदात '**एव**' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, जीव केवळ माझा (भगवंताचा) अंश आहे, यात प्रकृतीचा अंश किंचिन्मात्रही नाही. जसे शरीरात माता आणि पिता—दोन्हीच्या अंशाचे मिश्रण असते, तसे जीवात माझ्या

आणि प्रकृतीच्या अंशाचे मिश्रण (संयोग) नाही, तर हा केवळ माझा अंश आहे. म्हणून याचा संबंध केवळ माझ्याशी आहे, प्रकृतीशी नाही. प्रकृतीशी संबंध तर हा स्वत: जोडतो—'**मन: षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति**'.

अपरा प्रकृती परमात्म्याची आहे, परंतु जीवाने तिला आपले मानले आणि तिच्यापासून सुख घेऊ लागला, म्हणूनच तो बंधनात सांपडला आहे. आपली नसल्यामुळेच वस्तूंही राहत नाहीत आणि सुखही राहत नाही.

स्थूल, सूक्ष्म आणि कारण—या शरीराशी आपला संबंध मानणे हेच अनर्थाला कारण आहे. जीव शरीराला आपल्याकडे ओढतो (**कर्षति**) अर्थात् आपले मानतो. परंतु जे वास्तविक आपले आहे, त्या परमात्म्याला आपले मानतच नाही. ही जीवाची मूळ चूक आहे.

जीव ब्रह्माचा (निर्गुणाचा) अंश नाही तर ईश्वराचा (सगुणाचा) अंश आहे—'**ईश्वर अंस जीव अबिनासी**' (मानस ७। ११७। १). कारण ब्रह्म चिन्मय सत्तामात्र आहे. म्हणून त्यात अंश-अंशीभाव होऊ शकतच नाही. जीवाचे ब्रह्माशी ऐक्य (साधर्म्य) आहे अर्थात् अनेक रूपाने जो जीव आहे तोच एकारूपाने ब्रह्म आहे. शरीराशी संबंध झाल्यामुळे तो जीव आहे आणि शरीराशी संबंध न झाल्यास तो ब्रह्म आहे. म्हणून वास्तविक जीव आणि ब्रह्म-दोन्हीही समग्र भगवंताचे अंश आहेत. म्हणून भगवंताने स्वत:ला ब्रह्माची प्रतिष्ठा (आधार) म्हटले आहे—'**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहम्**' (१४। २७) आणि ब्रह्माला आपल्याच समग्ररूपाचे एक अंग म्हटले आहे—'**ते ब्रह्म तद्विदु:.........**' (७। २९-३०).

मन आणि इंद्रिये ज्याचे अंश आहेत, त्यातच राहतात—'**प्रकृतिस्थानि**'. यावरुन जीवाने हा उपदेश घ्यावा की, मीही ज्याचा अंश आहे, त्यातच निरंतर रहावे, त्याच्याशीच संबंध जोडावा. हा संबंध स्वयंलाच जोडावा लागेल, दुसरा जोडणार नाही. कारण स्वयंनेच जगताशी संबंध जोडला आहे आणि स्वयं हाच परमात्म्याशी विमुख झाला आहे. जगताशी सम्मुख होण्यात (संबंध जोडण्यात) जगत् कारण नाही आणि परमात्म्याशी विमुख होण्यात परमात्मा कारण नाही, तर दोन्हीत स्वयं हाच कारण आहे. परमात्म्याचा अंश असल्याने जीव स्वतंत्र आहे आणि याच स्वातंत्र्याचा त्याचे दुरुपयोग केला आहे. म्हणून याचा सदुपयोग स्वयंलाच करावा लागेल—'**उद्धरेदात्मनात्मानम्**' (गीता ६। ५).

प्रकृतीशी मन आणि इंद्रियांचा नित्य आणि वास्तविक संबंध आहे, परंतु मन आणि इंद्रियांचा स्वयंशी (आत्म्याशी) अनित्य आणि मानलेला संबंध आहे. अनित्य संबंध कधी स्थायी राहत नाही, तर बदलत राहतो आणि मिटत राहतो. स्वयंचा नित्य संबंध परमात्म्याशी आहे, जो कधी बदलत नाही किंवा मिटत नाही. परंतु अनित्य संबंधाचा स्वीकार करण्याने ह्याची नित्य संबंधाशी विमुखता होते, त्यामुळे त्याचा अनुभव येत नाही.

'**ममैवांशो जीवलोके**' पदांतून असा भाव निघतो की, आपण तर प्रभूला आपले मानतो, परंतु प्रभू आपणाला आपले जाणतात! जेव्हा जीव भगवंताला शरण होतो, तेव्हा तोही प्रभूला आपले जाणतो—'**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते**' (गीता ७। १४).

जीव भगवंताचा सनातन अंश आहे, म्हणून भगवंताशी आपला संबंध जोडणे अर्थात् त्यांना आपले मानणे हाच त्याचा वास्तविक पुरुषार्थ आहे. शरीरद्वारा होणाऱ्या पुरुषार्थात तरी क्रिया मुख्य आहे, जी केवळ संसारासाठीच होते, कारण शरीर संसाराचा अंश आहे. परंतु स्वयंद्वारा होणाऱ्या पुरुषार्थात भाव मुख्य आहे. म्हणून दोषरहित होणे, असंग होणे, भगवंताला आपले मानणे—हे स्वयंचे पुरुषार्थ आहेत. दोषरहित झाल्यास मनुष्य संसारासाठी उपयोगी होतो. शरीर-संसारापासून असंग झाल्यास आपल्यासाठी उपयोगी होतो. भगवंताला आपले मानल्याने भगवंतासाठी उपयोगी होतो. दोषरहित झाल्याविना मनुष्य संसारासाठी उपयोगी होऊ शकत नाही. शरीर-संसारापासून असंग झाल्याविना मनुष्य आपल्यासाठी उपयोगी होऊ शकत नाही. भगवंताशी आत्मीयतेचा संबंध जोडल्याविना मनुष्य भगवंतासाठी उपयोगी होऊ शकत नाही.

मी दोषरहित व्हावे, मी असंग व्हावे, मी भगवत्प्रेमी व्हावे—अशा आवश्यकतेचा अनुभव करणे हाही पुरुषार्थ आहे. परंतु सर्वांत प्रथम साधकाने असे स्वीकार करावे की, मी दोषरहित होऊ शकतो, असंग होऊ शकतो, प्रेमी होऊ शकतो. त्यासाठी साधकाने असे जाणून घ्यावे की, संसाराच्या नात्यानेही आपण सर्व एक आहेत, आत्म्याच्या नात्याने आपण सर्व एक आहोत आणि परमात्म्याचा नात्यानेही आपण सर्व एक आहोत. म्हणून जसे आपल्या शरीराच्या हिताचा भाव राहतो, तसेच संपूर्ण शरीरांच्या हिताचा भाव रहावा अथवा जसे आपण संपूर्ण शरीरापासून निर्लिप्त राहतो, तसेच या शरीरापासूनही निर्लिप्त रहावे. संपूर्ण शरीराशी आपल्या शरीराचे ऐक्य मानून आपण दोषरहित होऊ शकतो. आपल्या शरीरासह संपूर्ण शरीरांना सोडून आपण असंग (आपल्या स्वरूपात स्थित) होऊ शकतो. संपूर्ण शरीर-संसार यांना सोडून आपण भगवत्प्रेमी होऊ शकतो.

आपला संबंध परमात्म्याशी आहे—**'ममैवांशो जीवलोके'** म्हणून आपण परमात्म्यातच स्थित आहोत. परंतु शरीर-इंद्रिये-मन-बुद्धी यांचा संबंध अपरा-प्रकृतीशी आहे. म्हणून ते प्रकृतीतच स्थित आहेत—**'प्रकृतिस्थानि', 'विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसम्भवान्'** (गीता १३। १९). शरीराशी आपले मिलन कधी झालेही नाही, आत्ताही नाही, होणारही नाही, होऊ शकतही नाही आणि परमात्म्यापासून आपण कधी वेगळे झालेही नाही, आत्ताही नाही, होणारही नाही, होऊ शकतही नाही. आपल्यापासून दुराती-दूर कोणती वस्तू असेल तर ते शरीर आहे आणि जवळाती-जवळ कोणती वस्तू असेल तर तो परमात्मा आहे. परंतु कामना-ममता-तादात्म्य या कारणामुळे मनुष्याला उलट दिसते अर्थात् शरीर तर जवळ दिसते आणि परमात्मा दूर दिसतात! शरीर तर प्राप्त दिसते आणि परमात्मा अप्राप्त दिसतात!

शरीराशी मानलेल्या संबंधाचा त्याग करण्यासाठी साधकाने तीन गोष्टी स्वीकार कराव्यात. (१) शरीर माझे नाही, कारण याच्यावर माझा ताबा चालत नाही. (२) मला काहीही नको आणि (३) मला आपल्यासाठी काही करायचे नाही. जोपर्यंत साधक स्थूल, सूक्ष्म आणि कारण—तिन्ही शरीराशी आपला संबंध मानत राहतो तोपर्यंत स्थूलशरीरद्वारा होणारे 'कर्म', सूक्ष्मशरीराद्वारा होणारे 'चिंतन' आणि कारणशरीरद्वारा होणारी 'स्थिरता' (निर्विकल्प अवस्था)—तिन्हीही त्याला बंधनकारक होतात. परंतु तिन्ही शरीराशी संबंध-विच्छेद झाल्यास ते कर्म, चिंतन आणि स्थिरता—तिन्हीने बांधला जात नाही अर्थात् तिन्हीपासून असंग होतो.

भगवंताच्या नित्यसंबंधाच्या जागृतीसाठी साधकाने तीन गोष्टी स्वीकार कराव्यात. (१) प्रभू माझे आहेत, (२) मी प्रभूचा आहे आणि (३) सर्व काही प्रभूचे आहे. भगवंताच्या नित्यसंबंधाची जागृती झाल्यास साधकाला भगवत्प्रेमाची प्राप्ती होते. भगवत्प्रेमाच्या प्राप्तीतच मनुष्यजीवनाची पूर्णता आहे.

मनुष्यात तीन इच्छा असतात—भोगाची इच्छा, तत्त्वाची इच्छा आणि प्रेमाची इच्छा. भोगाची इच्छा 'कामना', तत्त्वाची इच्छा 'जिज्ञासा' आणि प्रेमाची इच्छा 'पिपासा' (अभिलाषा) म्हणविली जाते. भोगाची कामना शरीराला अनुसरून, तत्त्वाची जिज्ञासा स्वरूपाला अनुसरून आणि प्रेमाची पिपासा परमात्म्याला अनुसरून होते. शरीराला आपले मानणे चूक आहे, कारण शरीर प्रकृतीचा अंश आहे. म्हणून शरीराला अनुसरून होणारी भोगेच्छा प्राकृत (असत्) असल्यामुळे आपली नाही, तर भ्रमाने आहे. परंतु तत्त्वाची आणि प्रेमाची इच्छा आपली आहे, भ्रमाने नव्हे. म्हणून शरीराला निष्कामभावपूर्वक परिवाराच्या समाजाच्या आणि संसाराच्या सेवेत लावल्याने अथवा तत्त्वाची जिज्ञासा तीव्र झाल्यास चूक मिटते. चूक मिटण्याने भोगेच्छा मिटते. भोगेच्छा मिटल्याने तत्त्व जिज्ञासा पूर्ण होते आणि साधकाला स्वरूपात स्वाभाविक स्थितीचा अनुभव होतो अर्थात् त्याला तत्त्वज्ञान होते, तो जीवन्मुक्त होतो. त्यानंतर स्वरूप ज्याचा अंश आहे, त्या परमात्म्याच्या प्रेमाची पिपासा जागृत होते. संपूर्ण जीव परमात्म्याचे अंश आहेत, म्हणून संपूर्ण जीवांची अंतिम इच्छा प्रेमाचीच आहे. प्रेमाची इच्छा सार्वभौम इच्छा आहे. प्रेमाची प्राप्ती झाल्यास मनुष्यजन्म सफल होतो, मग काही शिल्लक राहत नाही.

***संबंध—*** *मनसहित इंद्रियांना आपले मानल्यामुळे जीव कशा प्रकारे त्यांना घेऊन अनेक योनीमध्ये फिरत असतो—याचे वर्णन भगवान् दृष्टान्तासह करीत आहेत.*

**शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः।**
**गृहीत्वैतानि संयाति वायुर्गन्धानिवाशयात्॥ ८॥**

जसे—

**वायुः** = वायू
**आशयात्** = गंधस्थानापासून
**गन्धान्** = गंध (ग्रहण करून घेऊन जातो).
**इव** = तसाच
**ईश्वरः अपि** = शरीरादिकांचा स्वामी बनलेला जीवात्माही
**यत्** = जे
**शरीरम्** = शरीर
**उत्क्रामति** = सोडतो, (तेथून)
**एतानि** = यांना (मनासहित इंद्रियांना)
**गृहीत्वा** = ग्रहण करून
**च** = पुन्हा
**यत्** = ज्याला (ज्या शरीराला)
**अवाप्नोति** = प्राप्त होतो (त्यात)
**संयाति** = निघून जातो.

***व्याख्या—* वायुर्गन्धानिवाशयात्—**ज्याप्रमाणे वायू अत्तराच्या फायापासून सुगंध घेऊन जातो परंतु तो सुगंध वायूत कायम राहत नाही. कारण वायू आणि गंध यांचा नित्य संबंध नसतो. त्याचप्रमाणे इंद्रिये, मन, बुद्धी, स्वभाव

इत्यादींना (सूक्ष्म आणि कारण-दोन्ही शरीरांना) आपले मानल्याकारणाने जीवात्मा त्यांना बरोबर घेऊन दुसऱ्या योनीत जातो.

जसा वायू तात्त्विक दृष्टीने गंधापासून निर्लिप्त असतो, तसाच जीवात्माही तात्त्विक दृष्टीने मन, इंद्रिये, शरीरादिकां-पासून निर्लिप्त आहे, परंतु ह्या शरीरेंद्रियाविषयी मी-माझेपणाची मान्यता असल्यामुळे त्यांना आपल्याकडे आकर्षित करतो.

जसा वायू आकाशाचे कार्य असूनही पृथ्वीचा अंश असलेल्या गंधाला बरोबर घेऊन फिरत असतो, तसाच जीवात्माही परमात्म्याचा सनातन अंश असूनही प्रकृतीचे कार्य असलेल्या (प्रतिक्षण बदलणाऱ्या) शरीरांना बरोबर घेऊन वेगवेगळ्या योनीत फिरत असतो. जड असल्यामुळे वायूचे ठिकाणी हा विवेक नाही की, त्याने गंधाला ग्रहण करू नये, परंतु जीवात्म्याला तर हा विवेक आणि सामर्थ्य मिळालेले आहे की, तो वाटेल तेव्हा शरीराचा मानलेला संबंध समाप्त करू शकतो. भगवंतांनी प्रत्येक मनुष्याला ही स्वतंत्रता प्रदान केलेली आहे की, तो वाटेल त्याच्याशी संबंध जोडू शकतो आणि वाटेल त्याचा संबंध तोडू शकतो. आपला भ्रम समाप्त करण्यासाठी केवळ आपली मान्यता बदलण्याची गरज आहे की, प्रकृतीचे अंश असलेल्या ह्या स्थूल, सूक्ष्म आणि कारणशरीराशी माझा (जीवात्म्याचा) कोणताही संबंध नाही. मग जन्म-मरणाच्या बंधनातून सहज मुक्ती आहेच.

भगवंतांनी येथे तीन शब्द दृष्टान्ताच्या रूपात दिले आहेत. (१) वायू (२) गंध आणि (३) आशय. आशय स्थानाला म्हणतात. जसे जलाशय (जल+आशय) अर्थात् पाण्याचे स्थान. येथे स्थूल शरीराला आशय म्हटले आहे. ज्या प्रमाणे गंधाचे स्थान असलेल्या अत्तराच्या फायापासून (आशयापासून) वायू गंध घेऊन जातो आणि फाया मागे राहतो. त्याचप्रमाणे वायुरूपी जीवात्मा गंधरूप असलेल्या सूक्ष्म आणि कारणशरीराला बरोबर घेऊन जातो, तेव्हा गंधाचे आशयरूपी स्थूलशरीर मागे पडून राहते.

**शरीरं यदवाप्नोति....गृहीत्वैतानि संयाति**—येथे "**ईश्वरः**" पद जीवात्म्याचा वाचक आहे. या जीवात्म्याकडून मुख्य तीन चुका होत आहेत—

(१) आपल्याला मन, बुद्धी, शरीरादी जड पदार्थांचा स्वामी मानतो परंतु वास्तविक स्वतः मात्र त्यांचा दास बनतो.

(२) आपल्याला त्या जड पदार्थांचा स्वामी समजल्याने आपला वास्तविक असलेला स्वामी परमात्मा ह्याला विसरून जातो.

(३) जड पदार्थांशी मानलेल्या संबंधाचा त्याग करण्यात स्वाधीन असूनही त्याचा त्याग करीत नाही.

परमात्म्याने जीवात्म्याला शरीरादी सामुग्रीचा सदुपयोग करण्याची स्वाधीनता दिली आहे. त्यांचा सदुपयोग करून आपला उद्धार करून घेण्यासाठी ह्या वस्तू दिल्या आहेत, त्यांचा स्वामी होण्यासाठी नव्हे! परंतु जीवाकडून ही फार मोठी चूक होत असते की, तो त्या सामुग्रीचा सदुपयोग करीत नाही, तर आपल्याला त्यांचा मालक समजतो, परंतु वास्तविक त्यांचा गुलाम होतो.

जीवात्मा जड पदार्थाशी मानलेल्या संबंधाचा त्याग तेव्हाच करू शकतो, जेव्हा त्याच्या हे लक्षात येइल की, यांचा मालक बनल्यामुळेच मी सर्वथा पराधीन झालो आहे आणि माझे पतन झाले आहे. हा ज्यांचा मालक बनतो, त्यांची गुलामी याच्या ठिकाणी येतच असते. याला केवळ भ्रम होतो की, मी यांचा मालक आहे. जड पदार्थांचा मालक बनल्याने एक तर त्याला त्या पदार्थांची सतत उणीव भासत असते आणि दुसरे म्हणजे तो स्वतःला "अनाथ" मानतो.

ज्याला स्वामित्व अथवा अधिकार प्रिय वाटतो तो परमात्मप्राप्ती करून घेऊ शकत नाही. कारण जो एखाद्या पद, वस्तू, व्यक्ती यांचा स्वामी बनतो तो आपल्या स्वामीला विसरून जातो—हा नियम आहे. उदाहरणार्थ, ज्या वेळी लहान बालक आपल्या आईलाच केवळ आपले मानून तिचीच इच्छा करते, त्यावेळी ते आईशिवाय राहू शकत नाही. परंतु तेच बालक जेव्हा मोठे होऊन गृहस्थ बनते आणि आपल्याला स्त्री, पुत्र इत्यादीचा स्वामी मानू लागते तेव्हा त्याच आई-जवळ राहणे त्याला आवडत नाही. हा स्वामी होण्याचाच परिणाम आहे. त्याचप्रमाणे हा जीवात्माही शरीरादी जड पदार्थांचा स्वामी (ईश्वर) बनून आपला वास्तविक स्वामी परमात्मा ह्याला विसरून जातो, त्यांना विमुख होतो. जोपर्यंत ही चूक किंवा विमुखता राहते तोपर्यंत जीवात्म्याला दुःख होतच राहते.

"**ईश्वरः**" पदाबरोबर "**अपि**" पदाचा एक विशेष अर्थ निघतो की, हा ईश्वर बनलेला जीवात्मा वायूसारखा असमर्थ, जड आणि पराधीन नाही. ह्या जीवात्म्यात असे सामर्थ्य आणि विवेक आहे की, हा वाटेल तेव्हा मानलेला संबंध सोडू शकतो आणि परमात्म्याशी नित्य संबंधाचा अनुभव घेऊ शकतो. परंतु संयोगजन्य सुखाच्या लोलुपतेमुळे हा संसाराशी मानलेल्या संबंधाला सोडत नाही आणि सोडूही इच्छित नाही. जडतेशी (शरीरादी) असलेले तादात्म्य सुटल्यावर जीवात्मा (गंधाप्रमाणे) शरीरांना बरोबर घेऊन जाऊ शकत नाही.

जीवाला दोन शक्ती प्राप्त आहेत (१) प्राणशक्ती

ज्यामुळे श्वासाचे आवागमन होत असते (२) इच्छाशक्ती, ज्या शक्तीने भोग प्राप्त करण्याची इच्छा करतो. प्राणशक्ती नेहमी श्वासोच्छ्‌वासद्वारे क्षीण होत राहते. प्राणशक्तीचे संपणे हाच मृत्यू म्हटला जातो. जडाचा संग करण्याने काही तरी करण्याची आणि काही तरी मिळविण्याची इच्छा कायम राहते. प्राणशक्तीच्या अस्तित्वात इच्छाशक्ती अर्थात् काही तरी करण्याची आणि काही तरी मिळविण्याची इच्छा समाप्त झाल्यावर मनुष्य जीवन्मुक्त होतो. प्राणशक्ती समाप्त झाली आणि इच्छा कायम राहिल्या तर दुसरा जन्म घ्यावाच लागतो. नवीन शरीर मिळाल्यावर इच्छाशक्ती तर तीच (पूर्वजन्माची) कायम राहते आणि प्राणशक्ती नवीन मिळते.

प्राणशक्तीचा व्यय इच्छा मिटविण्यात झाला पाहिजे. नि:स्वार्थ भावनेने संपूर्ण प्राण्यांच्या हिताविषयी रत राहिल्याने इच्छा सुगमतेने मिटतात.

येथे "**गृहीत्वा**" पदाचे तात्पर्य, जे आपले नाहीत त्यांच्याविषयी आसक्ती, ममता, प्रियता करणे, हे आहे. ज्या मन, इंद्रियांशी आपलेपणा करून जीवात्मा त्यांना बरोबर घेऊन फिरतो, ते मन, इंद्रिये कधी म्हणत नाहीत की, आम्ही तुमचे आहोत आणि तुम्ही आमचे आहात. यांचेवर जीवात्म्याचे शासनही चालत नाही, वाटेल तसे यांना ठेवू शकत नाही, परिवर्तन करू शकत नाही, असे असूनही यांचेशी आपलेपणा ठेवतो, जो भ्रमच आहे. वास्तविक हा आपलेपणाचा (आसक्ति-ममतायुक्त) संबंधच बंधनकारक आहे.

वस्तू आम्हाला मिळो अथवा न मिळो, उत्तम असो की निकृष्ट, आपल्या कामी येवो की न येवो, दूर असो किंवा जवळ असो, जर त्या वस्तूला आपण आपली मानतो तर तिच्याशी आपला संबंध कायमच आहे.

आपल्याकरवी सोडल्याशिवाय शरीरादीविषयी असलेल्या ममतेचा संबंध मृत्यू झाला तरी सुटत नाही. म्हणून मृत शरीराच्या अस्थींना गंगेत टाकल्याने त्या जीवात्म्याची पुढे गती होते. या मानलेल्या संबंधाला सोडण्यात आम्ही संपूर्णपणे स्वतंत्र आणि सबल आहोत. जर शरीराच्या अस्तित्वातच आपण त्याच्याशी असलेला आपला आपलेपणा हटवून टाकला तर जिवंत असतानाच मुक्त होऊन जाऊ.

जे आपले नाही त्याला आपले मानणे आणि जे आपले आहे त्याला आपले न मानणे हा फार मोठा दोष आहे, त्यामुळेच पारमार्थिक मार्गात उन्नती होत नाही.

या श्लोकात आलेले "**एतानि**" पद सातव्या श्लोकाच्या "**मन:षष्ठानीन्द्रियाणि**" (पाच ज्ञानेंद्रिये आणि मन) चे वाचक आहे. येथे "एतानि" पदाला सतरा तत्त्वांच्या समुदाय-रूपी सूक्ष्मशरीर आणि कारणशरीर (स्वभाव) यांचेही द्योतक मानावे. या सर्वांना ग्रहण करून जीवात्मा दुसऱ्या शरीरात जातो. जसे मनुष्य जुनी वस्त्रे टाकून नवी वस्त्रे धारण करतो, तसेच जीवात्मा जुन्या शरीराचा त्याग करून नवीन शरीराला प्राप्त होतो. (२।२२)

वास्तविक शुद्ध चेतनाचे (आत्म्या) एखाद्या शरीराला प्राप्त करणे आणि त्याचा त्याग करून दुसऱ्या शरीरात जाणे होऊ शकत नाही कारण आत्मा अचल आणि समानरूपाने सर्वत्र व्याप्त आहे. (२।१७,२४) शरीरांचे ग्रहण करणे आणि त्याग करणे परिच्छिन्न (एकदेशीय) तत्त्वाद्वाराच संभव आहे, परंतु आत्मा कधी कोणत्याही देश कालादिकात परिच्छिन्न होऊ शकत नाही. परंतु जेव्हा हा आत्मा प्रकृतीचे कार्य शरीराशी तादात्म्य करतो अर्थात् प्रकृतिस्थ होतो, तेव्हा (स्थूल, सूक्ष्म आणि कारण—तिन्ही शरीरात आपल्याला, तसेच आपल्यात तिन्ही शरीरांना धारण करणे, अर्थात् त्यांच्याविषयी आपलेपणा करण्याने) तो प्रकृतीचे कार्य शरीर ह्यांचे ग्रहण-त्याग करू लागतो. तात्पर्य शरीराला "मी" आणि "माझे" मानल्यामुळेच आत्मा सूक्ष्मशरीराच्या येण्या जाण्याला आपले येणे-जाणे मानतो. जेव्हा प्रकृतीचे कार्य शरीर ह्याच्याशी तादात्म्य समाप्त होते अर्थात् स्थूल, सूक्ष्म, आणि कारणशरीराशी आत्म्याचा मानलेला संबंध राहत नाही, तेव्हा हे शरीर आपल्या कारणभूत समष्टी तत्त्वात लीन होते. तात्पर्य, पुनर्जन्माचे मूळ कारण जीवाचे शरीराशी मानलेले तादात्म्यच आहे.

**परिशिष्ट भाव**—पूर्व श्लोकात '**कर्षति**' पद आणि या श्लोकात '**गृहीत्वा**' पद आले आहे. '**कर्षति**' चा अर्थ आहे—आपल्याकडे ओढणे आणि '**गृहीत्वा**' चा आहे—पकडणे अर्थात् तादात्म्य करणे. वायूचा दृष्टांत देण्याचे तात्पर्य असे आहे की, जीव वायूसारखा निर्लिप्त राहतो. शरीराशी लिप्त असूनही वास्तविक याची निर्लिप्तता कधी मिटत नाही—'**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते**' (गीता १३।३१). वायूत नेहमी गन्ध राहत नाही, आपोआप नाहीसा होतो. परंतु जीव जोपर्यंत मन-बुद्धी-इंद्रिये यांना सोडत नाही, तोपर्यंत ते सुटत नाहीत. याचे कारण असे आहे की, मन-बुद्धी-इंद्रिये यांना जीव स्वत: पकडतो—'**गृहीत्वैतानि**'. म्हणून स्वत:द्वारा सोडल्यावरच ते सुटतात.

प्रत्येक भोगापासून स्वाभाविक उपरती होते—हा सर्वांचा अनुभव आहे. भोगात प्रवृत्ती तर कृत्रिम असते, परंतु निवृत्ती स्वाभाविक असते. रुची तर जीव करतो परंतु अरुची सहज होते. जसे, बीडी पिणारे धूर आत ओढतात, परंतु तो बाहेर सहज

निघतो. मुख बंद केल्यास नाकावाटे निघतो. धूर तर टिकत नाही, परंतु सवय वाईट लागते, व्यसन जडते. तसेच भोग तर टिकत नाहीत, परंतु सवय वाईट लागते. भोग तर आपोआप सुटतात, त्यांच्यापासून अरुची आपोआप होते, परंतु सवय वाईट लागल्यामुळे जीव त्याला पुन्हा पुन्हा पकडत राहतो आणि 'ईश्वर' अर्थात् स्वतंत्र असूनही परवशतेचा अनुभव करतो. भोगांत लिप्त असूनही वास्तविक याची निर्लिप्तता मिटत नाही. परंतु याकडे तो लक्ष देत नाही आणि त्याला महत्त्व देत नाही. शरीराशी संबंध नसतानाही तो त्याच्याशी संबंध मानून सुख घेत राहतो. संबंध तर अनित्य असतो, परंतु संबंध-विच्छेद नित्य असतो. कारण संसाराच्या जातीचे (जड आणि परिवर्तनशील) असल्याने शरीर जीवाच्या दृष्टीने विजातीय आहे. विजातीय वस्तूशी संबंध होणे संभवतच नाही. परमात्म्याचा अंश असल्याने जीवाची परमात्म्याशी सजातीयता आहे. म्हणून याचा स्वाभाविक संबंध परमात्म्याशीच आहे. जर जीवाने संतांच्या, भगवंताच्या, शास्त्रांच्या वाणीवर विश्वास ठेवून परमात्म्याशी संबंध जोडला तर मग त्याला याचा अनुभव येईल. परंतु हा पदार्थांच्या संबंधाला प्राधान्य देतो. जोपर्यंत हा भगवंताशी संबंध जोडत नाही, तोपर्यंत भगवान् कोणताही संबंध टिकू देत नाहीत, तोडतच राहतात. जीवाने कितीही जोर लावला, तो संसाराचा संबंध स्थायी ठेवू शकतच नाही.

***संबंध*—*आता भगवान् सातव्या श्लोकात आलेल्या "मनःषष्ठानीन्द्रियाणि" पदाचा खुलासा करीत आहेत.***

**श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च।**
**अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते॥ ९॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यम्** | = हा (जीवात्मा) | **चक्षुः** | = नेत्र | **घ्राणम्** | = घ्राण (या पाचही इंद्रियांद्वारा) |
| **मनः** | = मनाचा | **च** | = तसेच | | |
| **अधिष्ठाय, एव** | = आश्रय घेऊनच | **स्पर्शनम्** | = त्वचा, | | |
| **श्रोत्रम्** | = श्रोत्र | **रसनम्** | = रसना | **विषयान्** | = विषयांचे |
| **च** | = आणि | **च** | = आणि | **उपसेवते** | = सेवन करतो. |

***व्याख्या*—अधिष्ठाय मनश्चायं**—मनात अनेक प्रकारचे (चांगले, वाईट) संकल्प-विकल्प होत राहतात. यामुळे "स्व" च्या स्थितीत काहीही फरक होत नाही, कारण "स्व" (चेतन-तत्त्व, आत्मा) जड शरीर, इंद्रिये, मन, बुद्धीच्या अत्यंत पलीकडे आणि त्यांचा आश्रय आणि प्रकाशक आहे. संकल्प-विकल्प येत-जात राहतात आणि "स्व" नेहमी जसाच्या तसा राहतो.

मनाचा संयोग झाल्यावरच ऐकणे, पाहणे, स्पर्श करणे, स्वाद घेणे तसेच वास येणे यांचे ज्ञान होते. जीवात्म्याला मनाविना इंद्रियापासून सुख-दुःख होऊ शकत नाही म्हणून येथे मनाला अधिष्ठित करण्याविषयी सांगितले गेले आहे. तात्पर्य, जीवात्मा मनाला अधिष्ठित करून अर्थात् त्याचा आश्रय घेऊनच इंद्रियाद्वारा विषयांचे सेवन करीत असतो.

**श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च**—श्रवणेंद्रिय अर्थात् कानात ऐकण्याची शक्ती* "**श्रोतम्**" आहे. आजपर्यंत आपण अनेक प्रकारचे अनुकूल (स्तुती, मान, मोठेपणा, आशीर्वाद, मधुर गान, वाद्य इत्यादी) आणि प्रतिकूल (निंदा, अपमान, शाप, शिवी इत्यादी) शब्द ऐकले आहेत, परंतु त्यामुळे "स्व" मध्ये काय फरक पडला?

एखाद्याला नातवाचा जन्म तसेच मुलाच्या मृत्यूचा समाचार एकाच वेळी मिळाला. दोन्ही समाचार ऐकल्याने एकाच्या "जन्माचे" आणि दुसऱ्याच्या "मृत्यूचे" जे ज्ञान झाले, त्या "ज्ञानात" कोणताही फरक झाला नाही. जर ज्ञानात कोणताही फरक आला नाही तर मग ज्ञात्यात फरक कसा येईल? म्हणून जन्माचा आणि मृत्यूचा समाचार

* मनुष्य आपल्या मनात काही ना काही विचार करीत असतो, त्याला संकल्प-विकल्प, मनोरथ अथवा मनोराज्य म्हणतात. झोपेच्या वेळी तेच "स्वप्न" होऊन दिसू लागतात. मनावर बुद्धीचा पडदा (प्रभाव) असल्यामुळे आपण मनात आलेली प्रत्येक गोष्ट प्रगट करीत नाही. परंतु बुद्धीचा पडदा दूर झाल्यावर मनात आलेली प्रत्येक गोष्ट सांगणे अथवा त्यानुसार आचरण करणे "वेडेपणा" म्हटला जातो. अशा प्रकारे मनोराज्य, स्वप्न, तसेच वेडेपणा हे तिन्ही एकच आहेत.

श्रवणेंद्रियाने दोन प्रकारचे ज्ञान होते (१) अपरोक्ष शब्दाचे ज्ञान आणि (२) परोक्ष विषयाचे ज्ञान. म्हणून श्रवणाचा फार महिमा आहे. ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्ग—दोन्हीही मार्गात "श्रवणा" ला मुख्य स्थान आहे. जरी डोळ्यांनी शास्त्रांचे अवलोकन, अध्ययन, करण्यानेही परोक्ष विषयाचे ज्ञान होते, तरीपण वास्तविक तीही (शब्दाचे लिखित स्वरूप असल्यामुळे) प्रकारान्तराने शब्दाची शक्तीच आहे. शास्त्रज्ञानही जसे (गुरुमुखाने) श्रवणाने होते, तसे वाचल्याने होत नाही. विद्याध्ययनामध्येही प्रथम ऐकल्यानेच बोध होतो. शब्दात अचिन्त्य शक्ती आहे, ज्याला श्रवणेंद्रियच ग्रहण करू शकतात, अन्य इंद्रिये ग्रहण करू शकत नाहीत.

ऐकण्याने अंत:करणात (मानलेल्या संबंधामुळेच) जो परिणाम होतो, त्याकडे दृष्टी न ठेवता या ''ज्ञाना'' वरच दृष्टी ठेवली पाहिजे. त्याचप्रमाणे इतर इंद्रियांच्या विषयात समजून घ्यावे.

नेत्रेंद्रिय अर्थात् नेत्रात पाहण्याची शक्ती ''**चक्षुः**'' आहे. आजपर्यंत आपण अनेक सुंदर, असुंदर, मनोहर, भयानक रूप अथवा दृश्य पाहिली आहेत, परंतु त्यामुळे आपल्या ''स्वरूपात'' काय फरक पडला?

स्पर्शेंद्रिय अर्थात् त्वचेत स्पर्श करण्याची शक्ती ''**स्पर्शनम्**'' आहे. जीवनात आपणाला अनेक कोमल, कठोर, लिबलिबित, थंड, गरम इत्यादी स्पर्शांचा अनुभव आला आहे, परंतु त्यामुळे ''स्व'' च्या स्थितीत काय फरक पडला?

रसनेंद्रिय अर्थात् जीभेत चव घेण्याची शक्ती ''**रसनम्**'' आहे. कडू, तिखट, गोड, आंबट, खारट, आणि तुरट—हे सहा प्रकारच्या भोजनाचे रस आहेत. आजपर्यंत आपण निरनिराळे रसयुक्त भोजन केले आहे, परंतु विचार करावा की, त्यापासून ''स्व'' ला काय प्राप्त झाले?

घ्राणेंद्रिय अर्थात् नाकात वास घेण्याची शक्ती ''**घ्राणम्**'' आहे. जीवनात आपल्या नाकाने अनेक प्रकारचे सुगंध आणि दुर्गंध ग्रहण केले आहेत, परंतु त्यापासून ''स्व'' मध्ये काय फरक पडला?

## विशेष गोष्ट

श्रोत्राचा वाणीशी, नेत्राचा पायाशी, त्वचेचा हाताशी, रसनेचा उपस्थाशी आणि घ्राणाचा गुदेशी (पाचही ज्ञानेंद्रियांचा पाचही कर्मेंद्रियांशी) घनिष्ठ संबंध आहे. जसे जो जन्मापासून बहिरा असतो, तो मुकाही असतो. पायाच्या तळव्याला तेलाने मालिश केल्यास नेत्रावर तेलाचा परिणाम होतो. त्वचा असल्यामुळेच हात स्पर्शाचे काम करतात. रसनेंद्रिय वश असल्यास उपस्थेंद्रियही वश होते. घ्राणाने गंधाचे ग्रहण होते आणि त्याचा गुदेशी संबंध असल्याने गुदेपासून गंधाचा त्याग होतो.

पंच महाभूतांच्या एका एका महाभूताच्या सत्त्वगुण अंशापासून ज्ञानेंद्रिय, रजोगुण अंशापासून कर्मेंद्रिय आणि तमोगुण अंशापासून शब्दादी पाच विषय बनले आहेत.

| पंचमहाभूत | सत्त्वगुण अंश | रजोगुण अंश | तमोगुण अंश |
|---|---|---|---|
| आकाश | श्रोत्र | वाक् | शब्द |
| वायू | त्वचा | हस्त | स्पर्श |
| अग्नी | नेत्र | पाद् | रूप |
| जल | रसना | उपस्थ | रस |
| पृथ्वी | घ्राण | गुदा | गंध |

पाचही महाभूतांच्या मिसळलेल्या सत्त्वगुण अंशापासून मन आणि बुद्धी, रजोगुण अंशापासून प्राण आणि तमोगुण अंशापासून शरीर बनले आहे.

**विषयानुपसेवते**—जसा व्यापारी एखाद्या कारणाने एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी दुकान लावतो, तसाच जीवात्मा एका शरीराला सोडून दुसऱ्या शरीरात जातो आणि जसा मागील शरीरात विषयांचे आसक्तिपूर्वक सेवन करीत होता, तसाच दुसऱ्या शरीरात गेल्यावर (तोच स्वभाव असल्याने) विषयांचे सेवन करू लागतो. अशा प्रकारे जीवात्मा, विषयाविषयी आसक्ती असल्याने, वारंवार उच्च-नीच योनीत भटकत राहतो.

भगवंतांनी हे मनुष्यशरीर आपला उद्धार करून घेण्यासाठी दिले आहे, सुख-दुःख भोगण्यासाठी दिले नाही. जसे ब्राह्मणाला गाय दान केल्यावर त्या गाईसाठी चारा-पाणी तर देऊ शकतो, परंतु दिलेल्या गाईचे दूध पिण्याचा त्याला हक्क नसतो. त्याचप्रमाणे मिळालेल्या शरीराचा सदुपयोग करणे आपले कर्तव्य आहे, परंतु याला आपले समजून सुख भोगण्याचा आपल्याला अधिकार पोहचत नाही.

## विशेष विचार

विषयाचे सेवन करण्याने परिणामी विषयाविषयी आसक्तीच वाढत जाते, जे पुनर्जन्म आणि संपूर्ण दुःखाचे कारण आहे. विषयात वास्तविक सुख नाहीच. केवळ आरंभी भ्रमाने सुख प्रतीत होत असते (१८।३८). जर विषयामध्ये सुख असते तर ज्यांच्याजवळ पुष्कळ भोगसामुग्री आहे, असे मोठमोठे धनी, भोगी आणि पदाधिकारी तर सुखी झालेच असते, परंतु वास्तविक पाहिले तर समजून येते की, तेही दुःखी आणि अशांतच आहेत. याचे कारण भोगपदार्थांत सुख नाहीच, नव्हते, असणार नाही आणि असूही शकत नाही. सुख घेण्याच्या इच्छेने जे जे भोग भोगले गेले, त्या त्या भोगांपासून धैर्य नष्ट झाले, ध्यान नष्ट झाले, रोग उत्पन्न

झाले, चिंता निर्माण झाली, व्यग्रता निर्माण झाली, पश्चाताप झाला, बेइज्जती झाली, शक्ती नष्ट झाली, संपत्ती गेली, शांती गेली तसेच दुःख, शोक, उद्वेग आले असा हा परिणाम विचारशील व्यक्तीच्या प्रत्यक्ष पाहण्यात येतो.*

ज्याप्रमाणे स्वप्नात पाणी पिल्याने तहान जात नाही, त्याचप्रमाणे भोगपदार्थापासून शांतीही मिळत नाही आणि मनातील जळनही समाप्त होत नाही. मनुष्य असा विचार करतो की, इतके धन मिळाले, इतका संग्रह झाला, एवढ्या (अमुक-अमुक) वस्तू प्राप्त झाल्या तर शांती मिळेल, परंतु तितके झाल्यावरही शांती मिळत नाही, उलट वस्तू प्राप्त होत असल्याने त्याची लालसा अधिक वाढत जाते.† धन इत्यादी भोगपदार्थ मिळाले तरीही ''आणखी मिळावे, आणखी मिळावे'' हा क्रम चालतच राहतो. परंतु संसारात जितके काही धन-धान्य आहे, जितक्या सुंदर स्त्रीया आहेत, जितक्या उत्तम वस्तू आहेत, त्या सर्वच्या सर्व एकाच वेळी एखाद्या व्यक्तीला जरी मिळाल्या तरीही त्यापासून त्याला तृप्ती होऊ शकत नाही.‡ याचे कारण हे आहे की, जीव अविनाशी परमात्म्याचा अंश तसेच चेतन आहे आणि भोगपदार्थ नाशवान् प्रकृतीचे अंश तसेच जड आहेत. चेतनाची भूक जड पदार्थाने कशी नाहीशी होऊ शकेल ? भूक लागली पोटात आणि शिरा पाठीवर बांधला तर भूक कशी नाहीशी होईल? तहान लागल्यावर उत्तमात उत्तम गरमा गरम शिरा खाल्ला तरी तहान नाहीशी होऊ शकत नाही. त्याचप्रमाणे जीवाला तहान आहे चिन्मय परमात्म्याची, परंतु तो त्या तहानेला जड पदार्थांद्वारा नाहीशी करू इच्छित असेल तर तृप्ती होणार नाही. तृप्ती तर दूरच राहो, जसजसा तो पदार्थांचा संग्रह करतो तसतशी त्याची भूकही वाढतच जाते. ही त्याची केवढी मोठी चूक आहे.

साधकाने आजच हा दृढ निश्चय करावा की, मला भोगबुद्धीने विषयाचे सेवन करावयाचेच नाही. त्याचा असा पक्का निश्चय झाला पाहिजे की, संपूर्ण संसार मिळूनही माझी तृप्ती करू शकत नाही. विषयसेवन न करण्याचा दृढ निश्चय झाल्याने इंद्रिये निर्विषय होतात आणि इंद्रियांच्या निर्विषय होण्याने मन निर्विकल्प होते. मनाच्या निर्विकल्पतेमुळे बुद्धी आपोआप सम होते आणि बुद्धी सम झाल्याने परमात्म्याच्या प्राप्तीचा आपोआप अनुभव येतो. (५।१९) कारण परमात्मा तर नेहमी प्राप्त आहेतच. विषयात प्रवृत्ती असल्याकारणानेच त्यांच्या प्राप्तीचा अनुभव येत नाही.

सुखभोग आणि संग्रह या दोहोत जे आसक्त होतात, त्यांच्यासाठी परमात्मप्राप्ती तर दूरच राहो, ते परमात्म्याकडे वाटचाल करण्याचा दृढ निश्चयही करू शकत नाहीत. (२।४४)

गोस्वामी श्रीतुलसीदासजी महाराज श्रीरामचरितमानस-च्या शेवटी प्रार्थना करतात—

**कामिहि नारि पिआरि जिमि लोभिहि प्रिय जिमि दाम।**
**तिमि रघुनाथ निरंतर प्रिय लागहु मोहि राम॥**

(मानस ७।१३०)

''जसे कामी माणसाला स्त्री (भोग) आणि लोभ्याला धन (संग्रह) प्रिय वाटतो, त्याचप्रमाणे रघुनाथाचे रूप आणि राम-नाम मला निरंतर प्रिय लागावे.'' तात्पर्य जसा कामी स्त्रीच्या रूपाला आकृष्ट होतो तसेच मी रघुनाथांच्या रूपामध्ये निरंतर आकृष्ट रहावे आणि जसा लोभी धनाचा संग्रह करीत राहतो तसेच मी राम-नामाचा (जपाद्वारा) निरंतर संग्रह करीत रहावे. संसाराचा भोग आणि संग्रह निरंतर प्रिय वाटत नाही—हा नियम आहे, परंतु भगवंताचे रूप आणि नाम निरंतर प्रिय लागत असते. संतांनी ही आपला अनुभव सांगितला आहे—

**चाख चाख सब छाडिया माया-रस खारा हो।**
**नाम-सुधारस पीजिये छिन बारं बारा हो॥**
**लगे मोहि राम पियारा हो॥**

**परिशिष्ट भाव**—विषयांचे सेवन केल्याने स्वयंची गौणता होते आणि शरीर-संसाराचे प्राधान्य होते. म्हणून स्वयंसुद्धा जगत्‌रूप होतो (गीता—सातव्या अध्यायाचा तेरावा श्लोक)!

***संबंध**—मागील तीन श्लोकांत जीवात्म्याच्या स्वरूपाचे वर्णन केले गेले आहे. त्या विषयाचा उपसंहार करण्यासाठी पुढील श्लोकात ''जीवात्म्याच्या स्वरूपाला कोण जाणतो आणि कोण जाणत नाही'' याचे वर्णन करीत आहेत.*

---

* भोगा न भुक्ता वयमेव भुक्तास्तपो न तप्तं वयमेव तप्ताः। कालो न यातो वयमेव यातास्तृष्णा न जीर्णा वयमेव जीर्णाः॥ (भर्तृहरि वैराग्यशतक)
''आपण भोगांना भोगले नाही, भोगांनीच आपल्याला भोगले आहे,आपण तप केले नाही, आपणच तप्त झालो, काल व्यतीत झाला नाही, आपणच व्यतीत झालो, तृष्णा जीर्ण झाली नाही, आपणच जीर्ण झालो।''

† न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति। हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते॥ (मनुस्मृति २।९४, श्रीमद्भा० ९।१९।१४)
भोगपदार्थांच्या उपभोगाने कामना कधी शांत होत नाही, तर जसे तुपाची आहुती मिळाल्यावर आग जशी अधिक भडकते, तशीच भोग-वासना-सुद्धा भोग भोगल्याने प्रबल होते.

‡ यत् पृथिव्यां व्रीहियवं हिरण्यं पशवः स्त्रियः। एकस्यापि न पर्याप्तं तस्मात्तृष्णां परित्यजेत्॥ (विष्णु पुराण ४।१०।२४, महाभारत आदि पर्व ८५।१३)

# उत्क्रामन्तं स्थितं वापि भुञ्जानं वा गुणान्वितम्।
# विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषः॥ १०॥

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **उत्क्रामन्तम्** | = शरीर सोडून जाताना | **भुञ्जानम्,** | = विषय भोगत | **अनुपश्यन्ति** | = जाणत |
| **वा** | = किंवा | **अपि** | असतानाही | **न** | = नाही |
| **स्थितम्** | = दुसऱ्या शरीरात स्थित असताना | **गुणान्वितम्** | = गुणयुक्त असलेला (जीवात्म्याचे स्वरूप) | **ज्ञानचक्षुषः** | = ज्ञानरूप नेत्र असलेले (ज्ञानी मनुष्यच) |
| **वा** | = अथवा | **विमूढा** | = मूढ मनुष्य | **पश्यन्ति** | = जाणतात. |

*व्याख्या*— **उत्क्रामन्तम्**—स्थूलशरीर सोडताना जीव सूक्ष्म आणि कारणशरीराला बरोबर घेऊन प्रस्थान करतो. याच क्रियेला येथे "**उत्क्रामन्तम्**" पदाने म्हटले आहे. जो-पर्यंत हृदयात स्पंदन चालू राहते तोपर्यंत जीवाचे प्रस्थान मानले जात नाही. हृदयाचे स्पंदन बंद झाल्यावरही जीव काही काळपर्यंत राहू शकतो. वास्तविक अचल असण्याने शुद्ध चेतन तत्त्वाचे आवागमन होत नाही, प्राणांचेच आवागमन होत असते. परंतु सूक्ष्म आणि कारणशरीराशी संबंध असल्याकारणाने जीवाचे आवागमन म्हटले जाते.

आठव्या श्लोकात ईश्वर बनलेल्या जीवात्म्याच्या विषयात आलेल्या "**उत्क्रामति**" पदाला येथे "**उत्क्रामन्तम्**" पदाने म्हटले गेले आहे.

**स्थितं वा**—ज्याप्रमाणे कॅमेऱ्यावर वस्तूचे जसे प्रतिबिंब पडते, त्याचे तसेच चित्र अंकित होते. त्याचप्रमाणे मृत्यू-च्या वेळी अंत:करणात ज्या भावाचे चिंतन होते, त्याच आकाराचे सूक्ष्मशरीर बनत असते. जसे कॅमेऱ्यावर पडलेल्या प्रतिबिंबानुसार चित्र तयार होण्यास वेळ लागतो, तसेच अंतकालीन चिंतनानुसार भावी स्थूलशरीराच्या बनण्यात (शरीरानुसार कमी-अधिक) वेळ लागतो.

आठव्या श्लोकात ज्याचे "**यदवाप्नोति**" पदाने वर्णन झाले आहे, त्यालाच येथे "**स्थितम्**" पदाने म्हटले गेले आहे.

**अपि भुञ्जानं वा**—मनुष्य जेव्हा विषयांना भोगत असतो तेव्हा आपणास फार सावधान समजतो आणि विषय-सेवनात सावधान राहतही असतो. विषयी मनुष्य शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध—यापैकी एका एका विषयाला उत्तम प्रकारे जाणत असतो. आपल्या माहितीनुसार एका एका विषयाचेही विशेष स्पष्टरीतीने वर्णन करत असतो. इतके सावधान असूनही तो "मूढ" च (अज्ञानी) आहे कारण विषयाविषयी ही सावधानी काही उपयोगाची नाही, उलट ही मृत्यूनंतर नरक आणि नीच योनीत घेऊन जाणारी आहे.

परमात्मा, जीवात्मा आणि संसार—या तिन्हींच्या विषयामध्ये शास्त्र आणि दार्शनिकांत अनेक मतभेद आहेत, परंतु जीवात्मा संसाराशी संबंध ठेवत असल्याने दु:खाला प्राप्त होतो आणि त्याने परमात्म्याशी संबंध ठेवला तर तो सुखाला प्राप्त होतो. याविषयी सर्व शास्त्रांचे आणि दार्शनिकांचे एकमत आहे.

संसार एक क्षणभरही स्थिर राहत नाही—हा अकाट्य नियम आहे. संसार क्षणभंगुर आहे. ही गोष्ट सांगण्यात ऐकण्यात आणि वाचण्यात येत असूनही मूढ मनुष्य संसाराला स्थिर समजतो. भोग, सामुग्री, भोक्ता आणि भोगरूपी क्रिया—या सर्वांना स्थायी मानल्याशिवाय भोग होऊच शकत नाही. भोगी मनुष्याची बुद्धी इतकी मूढ होत असते की, तो "या भोगापेक्षा श्रेष्ठ काही नाहीच" असा दृढ निश्चय करून घेतो (१६।११). म्हणून अशा मनुष्यांचे ज्ञाननेत्र बंदच राहतात. ते मृत्यूला निश्चित जाणत असले तरीही भोग भोगण्यासाठी (मृत्युलोकात राहूनही) नेहमी जिवंत राहण्याची इच्छा करतात.

"**अपि**" पदाचा भाव जीवात्मा ज्यावेळी स्थूल शरीरातून निघून (सूक्ष्म आणि कारणशरीरासह) जातो, दुसऱ्या शरीराला प्राप्त होतो, तसेच विषयांचा उपभोग करतो—या तिन्हीही अवस्थेत गुणांशी लिप्त असलेला दिसूनही वास्तविक तो स्वत: निर्लिप्तच राहतो. वास्तविक स्वरूपात "उत्क्रमण" ही नाही, "स्थिती" ही नाही आणि "भोक्तेपणा" ही नाही.

मागील श्लोकाच्या "**विषयानुपसेवते**" पदालाच येथे "**भुञ्जानम्**" पदाने म्हटले गेले आहे.

**गुणान्वितम्**—येथे "**गुणान्वितम्**" पदाचे तात्पर्य असे आहे की, गुणांशी संबंध मानीत राहिल्याकारणानेच जिवात्म्यात उत्क्रमण, स्थिती आणि भोग—ह्या तिन्ही क्रिया प्रतीत होतात.

वास्तविक आत्म्याचा गुणांशी संबंध नाहीच. अज्ञाना-नेच याने आपला संबंध गुणांशी मानून घेतला आहे, ज्यामुळे याला वारंवार उच्च-नीच योनीमध्ये जावे लागते. गुणांशी संबंध जोडून जीवात्मा संसारापासून सुख इच्छितो—ही त्याची

चूक आहे. सुख घेण्यासाठी शरीरही आपले नाही, मग दुसऱ्याची गोष्ट तर सोडाच!

मनुष्य जणू कोणा ना कोणा प्रकारे संसारातच फसू इच्छितो. व्याख्यान देणारी व्यक्ती श्रोत्यांना आपले समजू लागते. कोणाला भाऊ, बहीण नसतील तर तो धर्माचा भाऊ आणि बहीण बनवून घेतो. कोणाला पुत्र नसेल तर तो दुसऱ्याचा बालक दत्तक घेतो. अशा प्रकारे नव-नवीन संबंध जोडून मनुष्य सुख तर इच्छितो परंतु दुःखालाच प्राप्त होतो. हीच गोष्ट भगवान् सांगत आहेत की, जीव स्वरूपाने गुणातीत असूनही गुणांशी (देश, काल, वस्तू, व्यक्ती) संबंध जोडून त्यापासून बांधला जातो.

याच अध्यायाच्या सातव्या श्लोकात आलेले "**प्रकृतिस्थानि**" पदालाच येथे "**गुणान्वितम्**" पदाने म्हटले गेले आहे.

**मार्मिक गोष्ट**

जोपर्यंत मनुष्याचा प्रकृती अथवा तिचे कार्य गुण ह्यांच्याशी किंचिन्मात्रही संबंध असतो तोपर्यंत गुणांच्या अधीन होऊन त्याला कर्म करण्यासाठी बाध्य व्हावे लागते. (३।५) चेतन असून गुणांच्या अधीन राहणे अर्थात् जडतेची परतंत्रता स्वीकार करणे व्यभिचारदोष आहे. प्रकृतीपासून अथवा गुणांपासून सर्वथा मुक्त झाले असताना, जो स्वाधीनतेचा अनुभव होतो, त्यातही साधक जोपर्यंत (अहम्चा गंध असल्यामुळे) रस घेत असतो, तोपर्यंत व्यभिचारदोष राहतोच. रस न घेतल्यास जेव्हा तो व्यभिचार दोष समाप्त होतो तेव्हा आपल्या प्रेमास्पद भगवंताविषयी आपोआप प्रियता जागृत होते. मग प्रेमच प्रेम राहते, जे उत्तरोत्तर वृद्धिंगत होत जाते. या प्रेमाला प्राप्त करणे हेच जीवाचे अंतिम लक्ष्य आहे. या प्रेमाच्या प्राप्तीतच पूर्णता आहे. भगवंतही भक्तांना आपले अलौकिक प्रेम देऊनच प्रसन्न होतात आणि अशा प्रेमी भक्ताला योग्यामधील सर्वश्रेष्ठ योगी मानतात. (६।४७)

गुणातीत होण्यात तर (स्व चा विवेक सहायक असल्यामुळे) स्वतःच्या साधनेचा संबंध राहतो परंतु गुणातीत झाल्यावर प्रेमाची प्राप्ती होण्यात भगवंताच्या कृपेचाच संबंध राहतो.

**विमूढा नानुपश्यन्ति**—जसे भिन्न-भिन्न प्रकारचे कार्य करूनही आपण तेच राहतो, तसेच गुणयुक्त होऊन शरीर सोडताना, दुसऱ्या शरीराला प्राप्त होताना तसेच भोग भोगताना सुद्धा "स्व" (आत्मा) तोच राहतो. तात्पर्य, परिवर्तन क्रियेत होत असते, "स्व" मध्ये नव्हे. परंतु जो भिन्न भिन्न क्रियाशी मिसळून "स्व" लाही भिन्न भिन्न पाहू लागतो (३।२७), अशा अज्ञानी (तत्त्वाला न जाणणाऱ्या) मनुष्यासाठी येथे "**विमूढा नानुपश्यन्ति**" पद दिले गेले आहे.

मूढलोक भोग आणि संग्रहामध्ये इतके आसक्त राहतात की, शरीरादी पदार्थ नित्य राहणारे नाहीत—ही गोष्ट विचारातच घेत नाहीत. भोग भोगण्याचा काय परिणाम होईल? त्याकडे ते लक्षच देत नाहीत. भगवंतांनी गीतेच्या सतराव्या अध्यायात जेथे सात्त्विक, राजस आणि तामस पुरुषांना प्रिय लागणाऱ्या आहारांचे वर्णन करणार आहेत, तेथे सात्त्विक आहाराच्या परिणामाचे वर्णन प्रथम केले गेले आहे, राजस आहाराच्या परिणामाचे वर्णन शेवटी केले गेले आहे आणि तामस आहाराच्या परिणामाचे वर्णनच केले गेले नाही. (१७।८-१०) याचे कारण सात्त्विक मनुष्य कर्म करण्यापूर्वी त्याच्या परिणामावर (फल) दृष्टी ठेवतो, राजस मनुष्य अगोदर काम करून बसतो मग परिणाम जसा होईल तसा होवो, परंतु तामस मनुष्य तर परिणामाकडे दृष्टीच ठेवत नाही. त्याचप्रमाणे येथेही "**विमूढा नानुपश्यन्ति**" पद देऊन भगवान् जणू हे म्हणत आहेत की, मोहग्रस्त मनुष्य तामसच असतो. कारण मोह तमोगुणाचे कार्य आहे. तो विषयाचे सेवन करतेवेळी परिणामाचा विचारच करीत नाही. केवळ भोग भोगण्यात आणि संग्रह करण्यातच मग्न झालेला असतो. अशा माणसांचे ज्ञान तमोगुणाने झाकलेले राहते. या कारणाने ते शरीर आणि आत्मा यांच्या भेदाला जाणू शकत नाहीत.

**पश्यन्ति ज्ञानचक्षुषः**—प्राणी, पदार्थ, घटना, परिस्थिती कोणतीही स्थिर नाही अर्थात् दृश्यमात्र निरंतर अदर्शनात जात आहे, असा प्रत्यक्ष अनुभव होणे हेच ज्ञानरूपी नेत्राने पाहणे आहे. परिवर्तनाकडे दृष्टी राहण्याने अपरिवर्तनशील तत्त्वामध्ये स्थिती आपोआप होते, कारण नित्य परिवर्तनशील पदार्थाचा अनुभव अपरिवर्तनशील तत्त्वालाच होत असतो.

येथे असे समजू नये की, ज्ञानी मनुष्याचेही स्थूल शरीरातून निघून दुसऱ्या शरीराला प्राप्त होणे आणि भोग भोगणे होत असते. ज्ञानी मनुष्याचे स्थूलशरीर तर सुटेलच परंतु दुसऱ्या शरीराला प्राप्त करणे तसेच आसक्त बुद्धीने विषयाचे सेवन करणे त्याच्याकडून होत नाही. दुसऱ्या अध्यायाच्या तेराव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, जसे जीवात्म्याचे या देहामध्ये बालपण, तारुण्य आणि म्हातारपण होत असते तसेच अन्य शरीराची प्राप्ती होत असते. परंतु त्या विषयात ज्ञानी मनुष्य मोहीत होत नाही

अथवा विकाराला प्राप्त होत नाही. कारण तो ज्ञानी मनुष्य ज्ञानरूपी नेत्राद्वारा हे पाहतो की, जन्म-मृत्यू इत्यादी सर्व क्रिया अथवा विकार परिवर्तनशील शरीरामध्येच आहेत, अपरिवर्तनशील स्वरूपात नव्हे. स्वरूप ह्या विकारापासून सर्वथा सर्व काळी निर्लिप्त राहते. शरीराला आपले समजणे तसेच त्याच्याकडून सुख प्राप्त करण्याची आशा ठेवल्यानेच विमूढ माणसांना तादात्म्यामुळे हे विकार स्व मध्ये होत असलेले प्रतीत होतात. विमूढ माणसे आत्म्याला गुणांनी युक्त असलेले पाहतात आणि ज्ञाननेत्र असणारी माणसे आत्म्याला गुणरहित, वास्तविकरूपाने पाहतात.

**परिशिष्ट भाव**—गुणांशी संबंध मानल्यानेच जीव '**गुणान्वित**' होतो. जर संबंध मानणार नाही तर तो निर्गुणच (तिन्ही गुणांनी रहितच) आहे—'**अनादित्वान्निर्गुणत्वात्**' (गीता १३ । ३१). याचा आशय असा आहे की, गुणांशी संबंध झाल्यानेच जन्म-मरण होतात (गीता—तेराव्या अध्यायाचा एकवीसावा श्लोक). जरी आपली अवनती कोणीही इच्छित नाही, तरीही सुखासक्तीमुळे जीवाला याचा पत्ताच लागत नाही की, त्याची उन्नती कशात आहे. तो नाशवान् पदार्थांद्वारा आपली उन्नती करू इच्छितो, ज्याचा परिणाम महान् अवनती होते.

शरीराला सोडून जाणे, दुसऱ्या शरीरात स्थित होणे आणि विषयांना भोगणे—तिन्ही क्रिया वेग-वेगळ्या आहेत, परंतु त्यात राहणारा जीवात्मा एकच आहे—ही गोष्ट प्रत्यक्षात असूनही अविवेकी मनुष्य हिला जाणत नाही अर्थात् आपल्या अनुभवाकडे पाहत नाही, त्याला महत्त्व देत नाही. तिन्ही गुणांनी मोहित झाल्यामुळेच तो बेहोश राहतो (गीता—सातव्या अध्यायाचा तेरावा श्लोक). जीवात्मा कोणत्याही अवस्थेत निरंतर राहत नाही—हा सर्वांचा अनुभव आहे. याची निर्लिप्तता स्वत:सिद्ध आहे.

भगवंताने मागील श्लोकात पाच क्रिया सांगितल्या आहेत—ऐकणे, पाहणे, स्पर्श करणे, स्वाद घेणे आणि हुंगणे तसेच या श्लोकात तीन क्रिया सांगितल्या आहेत—शरीराला सोडून जाणे, दुसऱ्या शरीरात स्थित होणे आणि विषयांना भोगणे. या आठापैकी कोणतीही क्रिया निरंतर राहत नाही, परंतु स्वयं निरंतर राहतो. क्रिया तर आठ आहेत परंतु या सर्वांत स्वयं एकच राहतो. म्हणून यांच्या भावाचे आणि अभावाचे, आरंभाचे आणि अंताचे ज्ञान सर्वांना होते ज्याला आरंभाचे आणि अंताचे ज्ञान होते, तो स्वयं नित्य असतो.

शरीराचा, पदार्थांचा, प्रत्येक भोगाचा संयोग आणि वियोग होतो. अनेक अवस्थेत स्वयं एक राहतो आणि एक राहत असून अनेक अवस्थेत जातो. जर स्वयं एक नसता तर सर्व अवस्थांचा वेग-वेगळा अनुभव कोणी केला असता? परंतु अशी गोष्ट प्रत्यक्ष असूनही विमूढ मनुष्य याकडे लक्ष देत नाहीत, तर ज्ञानरूपी नेत्र असणारे योगी मनुष्यच याकडे पाहतात.

***संबंध**—पूर्व श्लोकात वर्णित तत्त्वाला जे पुरुष प्रयत्न करून जाणतात त्यांच्यात कोणती विशेषता आहे आणि जे प्रयत्न करूनही जाणत नाहीत त्यांच्यात कोणती कमी असते हे पुढील श्लोकात सांगतात.*

**यतन्तो योगिनश्चैनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम्।**
**यतन्तोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः॥ ११॥**

**यतन्तः** = प्रयत्न करणारे
**योगिनः** = योगीलोक
**आत्मनि** = आपण-आपल्यात
**अवस्थितम्** = स्थित असलेल्या
**एवम्** = या परमात्मतत्त्वाचा
**पश्यन्ति** = अनुभव करतात.
**च** = परंतु
**अकृतात्मनः** = ज्यांनी आपले अंत:करण शुद्ध केले नाही (असे)
**अचेतसः** = अविवेकी मनुष्य
**यतन्तः अपि** = प्रयत्न करूनही
**एनम्** = या तत्त्वाचा
**न, पश्यन्ति** = अनुभव करीत नाहीत.

*व्याख्या*— **यतन्तो योगिनश्चैनं पश्यन्ति**—येथे "**योगिनः**" पद त्या सांख्ययोगी साधकाचे वाचक आहे ज्याचा एकमात्र उद्देश परमात्मतत्त्वाला प्राप्त करण्याचा झालेला आहे.

येथे "**यतन्तः**" पद साधनपरक आहे. अंत:करणातील लगन, जी पूर्ण केल्याशिवाय चैन पडत नाही तिला यत्न म्हणतात.

ज्या साधकांचा एकमात्र उद्देश परमात्मतत्त्वाला प्राप्त करावयाचा आहे, त्यांच्यात असंगता, निर्ममता आणि निष्कामता आपोआप येते. उद्देशाच्या पूर्तीसाठी अनन्यभावाने जी उत्कंठा, तत्परता, व्याकूळता, विरहयुक्त चिंतन, प्रार्थना आणि विचार साधकाच्या अंत:करणात प्रकट होतात, त्या सर्वांना येथे "**यतन्तः**" पदाच्या अंतर्गत समजावे. ज्याच्या प्राप्तीचा उद्देश बनविला व ज्याची विमुखता प्रयत्नांनी दूर केली, त्याच तत्त्वाचा योगीलोक आपल्या स्वत:मध्ये

अनुभव घेतात. परमात्म्याला पूर्णपणे सन्मुख झाल्यावर योग्याची परमात्मतत्त्वात सदा सहज स्थिती राहत असते. हाच "**पश्यन्ति**" पदाचा भाव आहे.

जे सांख्ययोगी साधक सत्-असत् विचारद्वारा सत् तत्त्वाची प्राप्ती आणि असत् संसाराची निवृत्ती करू इच्छितात, ते विवेकाची पूर्णपणे जागृती झाल्यावर स्वतः आपल्यात स्थित असलेल्या परमात्मतत्त्वाचा अनुभव घेतात.

**आत्मन्यवस्थितम्**—परमात्मतत्त्वापासून देश, कालाचे अंतर नाही. तो समानरूपाने सर्वत्र आणि सदैव विद्यमान आहे. तोच सर्व भूतांच्या अंत:करणात स्थित असलेला सर्वांचा आत्मा आहे—"**अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः**" (१०।२०) म्हणून योगीलोक स्वतः आपल्यामध्येच या तत्त्वाचा अनुभव घेतात.

सत्ता (अस्तित्व अथवा "आहे" पणा) दोन प्रकारची असते (१) विकारी आणि (२) स्वत:सिद्ध. जी सत्ता उत्पन्न झाल्यानंतर प्रतीत होते, ती "विकारी" सत्ता म्हटली जाते आणि जी सत्ता कधीच उत्पन्न होत नाही, सदा (अनादिकालापासून) जशीच्या तशीच राहते ती "स्वत:सिद्ध" सत्ता म्हटली जाते. या दृष्टीने संसार आणि शरीराची सत्ता "विकारी" आणि परमात्मा व आत्म्याची सत्ता "स्वत:सिद्ध" आहे. विकारी सत्तेला स्वत:सिद्ध सत्तेमध्ये मिसळणे चूक आहे.* उत्पन्न झालेल्या विकारी सत्तेशी संबंध-विच्छेद करून अनुत्पन्न स्वत:सिद्ध सत्तेत स्थित होणे हाच "**आत्मनि अवस्थितम्**" पदांचा भाव आहे.

जीवाने (चेतन) भगवत्प्रदत्त विवेकाचा अनादर करून शरीराला (जड) "मी" आणि "माझे" मानले अर्थात् शरीराशी आपला संबंध मानून घेतला. जीवाच्या बंधनाचे कारण हा मानलेला संबंधच आहे. हा संबंध इतका दृढ आहे की, मृत्यूनंतरही सुटत नाही आणि कच्चा इतका आहे की, वाटेल तेव्हा सोडता येणे शक्य आहे. कोणाशीही आपला संबंध जोडण्यात अथवा तोडण्यात जीव पूर्णपणे स्वतंत्र आहे. याच स्वतंत्रतेचा दुरुपयोग करून जीव शरीरादी विजातीय पदार्थांशी आपला संबंध मानून घेतो.

आपल्या विवेकाला (शरीरापासून आपल्या भिन्नतेचे ज्ञान) महत्त्व न दिल्याने विवेक दबून जातो. विवेक दबल्यावर शरीराची (जड तत्त्व) प्रधानता होते आणि ते सत्य प्रतीत होऊ लागते. सत्संग, स्वाध्याय इत्यादीने जस-जसा विवेक विकसित होतो, तस-तसा शरीराशी मानलेला संबंध सुटत जातो. विवेक जागृत झाल्यावर परमात्म्याशी (चिन्मय-तत्त्व) आपल्या वास्तविक संबंधाचा, त्याच्यात आपल्या स्वाभाविक स्थितीचा अनुभव होतो. हेच "**आत्मनि अवस्थितम्**" पदांचा भाव आहे.

विकारी सत्तेच्या (संसार) संबंधाने अहंतेची ("मी"-पणा) उत्पत्ती होत असते. ही अहंता दोन प्रकाराने मानली जाते (१) श्रवणाने मानणे. जसे दुसऱ्याकडून ऐकून "मी अमुक नावाचा आहे", "मी अमुक वर्णाचा आहे", इत्यादी अहंता मानली जाते. (२) क्रियेने मानणे. जसे व्याख्यान देणे, शिक्षण देणे, चिकित्सा करणे इत्यादी क्रियेने "मी वक्ता आहे", "मी शिक्षक आहे", "मी चिकित्सक आहे" इत्यादी अहंता मानली जाते. या दोन्हीही प्रकारच्या अहंता सदा राहणाऱ्या नाहीत परंतु "आहे" रूपी स्वत:सिद्ध सत्ता सदा राहणारी आहे. "मी" रूपात मानलेल्या अहंतेचा त्याग झाल्यावर "आहे" रूपी विकारी सत्तेचासुद्धा आपोआप त्याग होतो आणि योग्याला "आहे" रूपी स्वत:सिद्ध सत्तेत आपल्या स्थितीचा अनुभव येतो. हाच स्वतः आपण आपल्यामध्ये तत्त्वाचा अनुभव घेणे आहे.

### मार्मिक गोष्ट

(१)

देश कालादींच्या अपेक्षेने म्हटले जाणारे "मी", "तू" "हे" आणि "ते" ह्या चारींच्या मूळाशी "आहे" च्या रूपात एकच परमात्मतत्त्व समानरूपाने विद्यमान आहे. ते या चारीचेही प्रकाशक व आधार आहे. "मी" "तू" "हे" आणि "ते" हे चारीही निरंतर परिवर्तनशील आहेत आणि "सर्वव्यापक आहे" नित्य अपरिवर्तनशील आहे. ह्यामध्ये "तू" आहेस, "हे" आहे, "ते" आहे, असे तर म्हटले जाते पण "मी आहेस" असे न म्हणता "मी आहे" असे म्हटले जाते. कारण असे की, "मी आहे" मध्ये "एकदेशीय आहे" हे मीपणामुळे आले आहे. जोपर्यंत मीपणा आहे तोपर्यंत "आहे" च्या रूपात एकदेशीयता व परिच्छिन्नता आहे. मीपणा मिटल्यावर एक "सर्वव्यापक आहे" च शिल्लक राहते.

**आत्मनि अवस्थितम्**—याचे तात्पर्य व्यष्टीत समष्टी आणि समष्टीत व्यष्टी स्थित आहे. जसा समुद्र आणि त्याच्या लाटा एकमेकापासून वेगळ्या केल्या जाऊ शकत नाहीत. परंतु जसे जल-तत्त्वात समुद्र आणि लाटा हे दोन्हीही नसतात (वास्तविक एक जल-तत्त्वच असते), तसेच व्यष्टी आणि समष्टी हे दोन (परमात्मतत्त्वाच्या दृष्टीने

* विकारी सत्तेला (शरीर) स्वत:सिद्ध सत्तेमध्ये मिळविण्याचे तात्पर्य, आपल्याला शरीर मानणे (अहंता) आणि शरीराला आपले मानणे (ममता) आहे. आपल्याला शरीर मानल्याने शरीर सत्य प्रतीत होते आणि शरीराला आपले मानल्याने शरीराविषयी प्रियता होते.

पाहिले तर) नाहीत तर एकमेव परमात्मतत्त्वच आहे, असा अनुभव घेणे म्हणजेच आपल्या स्वतः मध्ये परमात्मतत्त्वाचा अनुभव घेणे आहे.

''मी'' पणामुळेच (संसारात सुखासक्ती तसेच परमात्मविमुखता झाल्याने) आपल्या स्वतःमध्ये परमात्म्याचा अनुभव येत नाही. म्हणून परमात्म्याला स्वतः आपल्याहून वेगळे समजल्याकारणाने त्याच्यापासून दूरतेचा किंवा वियोगाचा अनुभव करावा लागतो आणि त्याच्या प्राप्तीसाठी ठिकठिकाणी भटकावे लागते. आपल्याहून वेगळे जितके पदार्थ आहेत, त्यांचा वियोग होणे अपरिहार्य आहे. पण आपल्या स्वतः मध्ये परमात्म्याचा अनुभव करणाऱ्यास त्याच्यापासून आपल्या दूरतेचा किंवा वियोगाचा अनुभव करावा लागत नाही.*

आपल्या स्वतःमध्ये परमात्म्याला पाहणे भिन्नतेला (द्वैतभाव) पोषक नाही, तर भिन्नतेचे नाशक आहे. वास्तविक ''मी'' पणाच भिन्नतेचा पोषक आहे. मनुष्याने भिन्नतेचे वाचक ''मी'' पणा अथवा परिच्छिन्नता, पराधीनता, अभाव, अज्ञान, इत्यादी विकारांना, भ्रमाने आपल्या स्वतःमध्ये मानून घेतले आहे. हा भ्रम दूर करण्यासाठी परमात्म्याला स्वतः आपण आपल्यामध्ये पहावयाचे आहे. या विकारांचा नाश परमात्म्याला स्वतः आपण आपल्यामध्ये पाहण्यानेच होऊ शकतो. हे विकार तोपर्यंतच असतात जोपर्यंत साधक ''एकदेशीय आहे'' ला पाहतो (मानतो), ''सर्वव्यापक आहे'' ला नाही. या ''एकदेशीय आहे'' च्या ऐवजी ''सर्वव्यापक आहे'' ला पाहण्याने कोणताही विकार राहत नाही. कारण ''सर्वव्यापक आहे'' मध्ये किंकित्मात्रही विकार नाही.

संसार बदलणारा आहे. संसाराचाच अंश असल्या-कारणाने ''मी'' ही बदलणारा आहे, जसे मी बालक आहे, मी तरुण आहे, मी वृद्ध आहे, मी रोगी आहे, मी निरोगी आहे इत्यादि† संसाराप्रमाणे ''मी'' ही उत्पन्न आणि नष्ट होणारा आहे. जसा संसार नाही तसा ''मी'' ही नाही.

**है सो सुन्दर है सदा, नहि सो सुन्दर नाहीं।**
**नही सो परगट देखिये, है सो दीखे नाहि॥**

''आहे'' सदा आहे आणि ''नाही'' कधीच नाही. ''आहे'' दिसण्यात येत नाही, परंतु ''नाही'' दिसण्यात येते. कारण ज्याच्याद्वारा आपण ''नाही'' ला पाहतो, ते मन, बुद्धी, इंद्रिये इत्यादीही ''नाही'' चे अंश आहेत. त्रिपुटीत पाहणे सजातीयतेमध्येच होत असते अर्थात् त्रिपुटीने होणाऱ्या (करणसापेक्ष) ज्ञानात सजातीयतेचे होणे आवश्यक आहे. म्हणून ''नाही'' द्वारा ''नाही'' लाच पाहता येणे शक्य आहे, ''आहे'' ला नव्हे. ''आहे'' चे ज्ञान त्रिपुटीहूनरहित (करणनिरपेक्ष) आहे.

''नाही'' ची स्वतंत्र सत्ता नसतानाही ''आहे'' च्या सत्तेनेच 'ह्यांची सत्ता दिसत असते. ''आहे'' 'नाही' च ''नाही'' चा प्रकाशक आणि आधार आहे. ज्याप्रमाणे डोळ्याने संसाराला तर पाहू शकतो परंतु डोळ्याने डोळ्याला पाहू शकत नाही. कारण ज्याने पाहतो ते डोळे आहेत. त्याच प्रमाणे जो सर्वांना जाणणारा आहे, त्या परमात्म्याला कसे आणि कशाने जाणले जाऊ शकेल?

**''विज्ञातारमरे केन विजानीयात्''** (बृहदारण्यक० २।४।१४) जो ''आहे'' ने प्रकाशित होतो तो (''नाही'') ''आहे'' ला कसा प्रकाशित करू शकेल ?

आपल्या स्वतःमध्ये स्थित असलेल्या तत्त्वाचा (''आहे'') अनुभव आपल्या स्वतःद्वाराच (''आहेनेच'') होऊ शकतो. इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीद्वारा (''नाहीने'') मुळीच नव्हे. आपल्या स्वतः ने होणारे ज्ञान स्वाधीन आणि दुसऱ्याकडून (मन, बुद्धी इत्यादी) होणारे ज्ञान पराधीन असते. स्वतः आपल्यात स्थित असलेल्या तत्त्वाचा अनुभव करण्यासाठी कोण्या दुसऱ्याची साहाय्यतासुद्धा घेण्याची आवश्यकता नाही.

कानानी ऐकणे, मनाने मनन करणे, बुद्धीने विचार करणे इत्यादी उपायांनी कोणीही तत्त्वाला जाणू शकत नाही.‡ कारण इंद्रिये, मन, बुद्धी, देश, काळ, वस्तू इत्यादी सर्व प्रकृतीची कार्ये आहेत. प्रकृतीच्या कार्यांने त्या तत्त्वाला कसे जाणता येईल, जे प्रकृतीच्याही सर्वथा पलीकडे आहे? म्हणून

---

* तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरास्तेषां सुखं शाश्वतं नेतरेषाम्॥ (कठ० २।२।१३, श्वेताश्वतर० ६।१२)
आपल्या स्वतः मध्ये स्थित (आत्मस्थ) परमात्म्याला जे ज्ञानी मनुष्य निरंतर पाहतात, त्यांनाच सदा राहणारे सुख मिळते, इतरांना नव्हे.

† येथे शंका होऊ शकते की बाल, तरुण अवस्था तर बदलून गेल्या, परंतु ''मी तर तोच आहे'' अर्थात् ''मी'' तर बदलला नाही. त्याचे समाधान असे आहे की, ''विकारी'' सत्तेला (जड) स्वतःसिद्ध सत्तेमध्ये (चेतन) मिसळल्यामुळेच ''मी'' मध्ये परिवर्तन दिसत नाही. वास्तविक ''मी'' चा प्रकाशक (''स्व'') तोच राहतो. ''मी'' मात्र तोच राहत नाही. ''मी बालक आहे'' यात जो ''मी'' आहे, तो ''मी तरुण आहे'' यात नसतो. अवस्थेबरोबर सूक्ष्मरूपाने ''मी'' ही बदलतो. त्याचप्रमाणे इतर शरीराची प्राप्ती (दुसरा जन्म) झाल्यावरही पूर्वीच्या शरीराचा ''मी'' तर राहत नाही, परंतु सत्ता राहते (२।१३)
''स्वतःसिद्ध'' सत्तेच्या संबंधाने ''मी तोच आहे'' म्हटले जाते आणि ''विकारी'' सत्तेच्या संबंधाने ''मी बदलून गेलो'' म्हटले जाते.

‡ (१) नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन। (कठ० १।२।२३, मुण्डक ३।२।३)

प्रकृतीच्या कार्याचा त्याग (संबंध-विच्छेद) केल्यावरच तत्त्वाची प्राप्ती होते आणि ती आपल्या स्वतःमध्येच होत असते.

साधकाची सर्वात मोठी चूक ही होते की, तो ज्या रीतीने संसाराला जाणत असतो त्याच रीतीने परमात्म्यालाही जाणू इच्छितो. परंतु संसार आणि परमात्मा—दोघांना जाणण्याची रीती परस्पर विरुद्ध आहे. संसाराला मन, बुद्धी, इंद्रियाद्वारा जाणले जाते कारण त्याचे ज्ञान करणसापेक्ष आहे. परंतु परमात्म्याला इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीद्वारा जाणले जाऊ शकत नाही. कारण त्याचे ज्ञान करणनिरपेक्ष आहे.

जडतेच्या आश्रयाने चिन्मयतेच्या स्थितीचा अनुभव होऊच शकत नाही. जडतेचा (स्थूल, सूक्ष्म, आणि कारण-शरीर) आश्रय घेऊन जे परमात्मतत्त्वाचा अनुभव करू इच्छितात, ते पुरुष समाधिस्थ होउनही परमात्मतत्त्वाचा अनुभव करू शकत नाहीत; कारण समाधी कारणशरीराच्या आश्रित राहते.*

जे परमात्म्याला आपले आणि आपल्याला परमात्म्याचे जाणतात, ते ज्ञानरूपी नेत्र असणारे योगीलोक शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीपासून आपल्याला वेगळे करून स्वतः आपल्यात स्थित असलेल्या परमात्मतत्त्वाचा अनुभव करून घेतात. परंतु जे शरीराला आपले आणि आपल्याला शरीराचे मानतात, ते विमूढ आणि अकृतात्मा पुरुष, शरीर, इंद्रिये, मन, बुद्धीद्वारा प्रयत्न करूनही स्वतः आपल्यात स्थित असलेल्या परमात्मतत्त्वाचा अनुभव करू शकत नाहीत.

(२)

"**आत्मनि अवस्थितम्**" पदांत भगवंतांनी स्वतःला संपूर्ण प्राण्यांच्या आत्म्यात स्थित (सर्वव्यापी) असल्याचे म्हटले आहे. याचा अनुभव करण्यासाठी साधकांनी ह्या चार गोष्टी दृढतेने मानल्या पाहिजेत-(१) परमात्मा येथे आहेत (२) परमात्मा आत्ता आहेत. (३) परमात्मा आपल्यात आहेत. (४) परमात्मा आपले आहेत.

परमात्मा सर्व ठिकाणी (सर्वव्यापी) असल्याने येथेही आहेत. सर्व काळात (तिन्ही काळात) असल्याने आत्ताही आहेत. सर्वांमध्ये असल्याने आपल्यातही आहेत आणि सर्वांचे असल्याने आपलेही आहेत. या दृष्टीने परमात्मा येथे असल्याने त्यांना प्राप्त करण्यासाठी दुसऱ्या ठिकाणी जाण्याची आवश्यकता नाही. आत्ता असल्याने त्यांच्या प्राप्तीसाठी भविष्यात प्रतिक्षा करण्याची आवश्यकता नाही. आपल्यात असल्याने त्यांना बाहेर शोधण्याची जरूरी नाही आणि आपले असल्याने त्यांच्याशिवाय कोणालाही आपले मानण्याची आवश्यकता नाही. आपले असल्याने ते स्वाभाविकच अत्यंत प्रिय वाटतील.

प्रत्येक साधकासाठी उपर्युक्त चारीही गोष्टी अत्यंत महत्त्वपूर्ण आणि तात्काळ लाभदायक आहेत. साधकांनी या चार गोष्टी दृढतेने मानल्या पाहिजेत. सर्व साधनांचे सार हे साधन आहे. यात कोणती योग्यता, अभ्यास, गुण इत्यादीचीही जरूरी नाही. या गोष्टी स्वतःसिद्ध आणि वास्तविक आहेत. म्हणून यांना मान्य करून घेण्यासाठी सर्व योग्य आहेत, सर्व पात्र आहेत, सर्व समर्थ आहेत. अट एवढीच आहे की, त्यांना एकमात्र परमात्म्याचीच इच्छा असावी.

**यतन्तोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः**—ज्यांनी आपले अंतःकरण शुद्ध केले नाही त्या पुरुषांना येथे "**अकृतात्मानः**" म्हटले गेले आहे. सत् असत्‌च्या ज्ञानाला (विवेक) महत्त्व न दिल्यामुळे अशा पुरुषांना "**अचेतसः**" म्हटले गेले आहे.

ज्यांच्या अंतःकरणात संसारातील व्यक्ती, पदार्थ इत्यादीचे महत्त्व कायम आहे आणि जे शरीरादींना आपले मानून त्यांच्याकडून सुखभोगाची आशा ठेवतात, असे सर्वच पुरुष "**अकृतात्मानः**" आणि "**अचेतसः**" आहेत. असे पुरुष तत्त्वाच्या प्राप्तीची तर इच्छा ठेवतात, परंतु ते शरीर, मन, बुद्धी इत्यादी जड (प्राकृत) पदार्थांच्या साहाय्याने चेतन परमात्मतत्त्वाला प्राप्त करू इच्छितात. परमात्मा जड पदार्थांच्या साहाय्याने नव्हे तर जडतेच्या त्यागाने (संबंध-विच्छेद) प्राप्त होतात.

या श्लोकात "**यतन्तः**" पद दोन वेळा आले आहे.

---

"हे परमात्मतत्व तर प्रवचनाने, बुद्धी आणि पुष्कळ श्रवणानेही प्राप्त होऊ शकत नाही."

(२) नैव वाचा न मनसा प्राप्तुं शक्यो न चक्षुषा। (कठ० २।३।१२)

"हे परमात्मतत्व तर वाणीने, मनाने आणि डोळ्यानेही प्राप्त केले जाऊ शकत नाही"

* स्थूलशरीराने "क्रिया", सूक्ष्मशरीराने "चिंतन" तसेच कारणशरीराने "समाधी" होते.

कारणशरीर व त्याने होणारी समाधी जागृत, स्वप्न आणि सुषुप्तीअवस्थेपेक्षा विशिष्ट असूनही सूक्ष्मरूपाने निरंतर क्रियाशील राहते. या कारण-शरीराहून अतीत झाल्यावर केवळ एक तत्त्व शिल्लक राहते. हीच क्रिया-अक्रिया दोहोहून अतीत सदा अखंड राहणारी "स्वरूप समाधी" आहे. कारणशरीराने होणाऱ्या समाधीतून तर व्युत्थान होते. परंतु "स्वरूप-समाधी" अर्थात् स्वतःसिद्ध स्वरूपाचा बोध झाल्यावर समाधी आणि व्युत्थान दोन्हीही होत नाहीत. याला "निर्बीज समाधी" ही म्हणतात. कारण यामध्ये संसाराचा संबंध (बीज) सर्वथा नष्ट होते. याला "सहजावस्था" ही म्हणतात. परंतु ही वास्तविक अवस्था नाही तर अवस्थातीत आहे. अवस्थातीत कोणती अवस्था नसते.

भाव असा आहे की, प्रयत्न करण्यात सारखेपणा असला तरी एक (ज्ञानी) पुरुष तर तत्त्वाचा अनुभव करून घेतो, दुसरा (मूढ) करू शकत नाही. यावरुन हे सिद्ध होते की, शरीर, इंद्रिये, मन, बुद्धीद्वारा केला गेलेला प्रयत्न तत्त्व-प्राप्तीत सहायक असूनही अंत:करणाशी (जडता) संबंध कायम असल्यामुळे आणि अंत:करणात सांसारिक पदार्थांचे महत्त्व असल्याकारणाने (प्रयत्न केला तरी) तत्त्व प्राप्त केले जाऊ शकत नाही. ज्यांची दृष्टी असत् (सांसारिक भोग आणि संग्रह) वरच कायम आहे, असे पुरुष सत्‌ला (तत्त्व) कसे पाहू शकतील?

अकृतात्मा आणि अचेतस पुरुष ध्यान, स्वाध्याय, जप इत्यादी सर्व काही करत असतात परंतु अंत:करणात जडतेचे (सांसारिक भोग आणि संग्रह) महत्त्व असल्या-कारणाने त्यांना तत्त्वाचा अनुभव येत नाही. जरी अशा पुरुषाकडून केला गेलेला प्रयत्नही निष्फळ जात नाही, तरीपण तत्त्वाचा अनुभव त्यांना वर्तमानात होत नाही. वर्तमानात तत्त्वाचा अनुभव जडतेचा संपूर्णपणे त्याग झाल्यावरच होऊ शकतो.

ज्याचा आश्रय घेतला जातो त्याचा त्याग होऊ शकत नाही—हा नियम आहे. म्हणून शरीर, मन, बुद्धी इत्यादी जड पदार्थांचा आश्रय घेऊन साधक जडतेचा त्याग करू शकत नाही. याशिवाय मन, बुद्धी इत्यादी जड पदार्थांच्या साहाय्याने साधन करणाऱ्यात सूक्ष्म अहंकार कायम राहतो, जो जडतेचा त्याग झाल्यावरच निवृत्त होतो. जडतेचा त्याग करण्याचा सुगम उपाय एकमात्र भगवंताचा आश्रय घेणे अर्थात् ''मी भगवंताचा आहे आणि भगवान् माझे आहेत'' या वास्तविकतेला स्वीकार करणे, यावर अटळ विश्वास ठेवणे हा आहे. यासाठी प्रयत्न अथवा अभ्यास करण्याचीही आवश्यकता नाही. वास्तविक ह्या गोष्टीची दृढतेने केवळ स्वीकृती करण्याची जरूरी आहे.

**परिशिष्ट भाव**—भोगही सदा आपल्याबरोबर राहत नाही किंवा संग्रहही आपल्याबरोबर राहत नाही—हा विवेक मनुष्यात स्वाभाविक आहे. परंतु जे मनुष्य शास्त्र जाणणारे असून, सत्संग करीत असून, साधन करीत असूनही आपल्या विवेकाकडे लक्ष देत नाहीत, भोग आणि संग्रहापासून वेगळे असण्याचा अनुभव करीत नाहीत, ते 'अकृतात्मा' आहेत. अशा मनुष्यांना अठराव्या अध्यायाच्या सोळाव्या श्लोकात 'अकृतबुद्धी' आणि 'दुर्मती' म्हटले गेले आहे. जरी परमात्मप्राप्ती कठीण नाही, तरी अंत:करणात राग, आसक्ती, सुखबुद्धी पडून राहिल्यास ते साधन करीत असूनही परमात्म्याला जाणत नाहीत. कारण भोग आणि संग्रहात आवड ठेवणाऱ्याचा विवेक स्थिर राहत नाही.

पूर्व श्लोकात ज्यांना '**विमूढा:**' म्हटले आहे, त्यांना येथे '**अचेतस:**' म्हटले आहे. गुणांनी मोहित झाल्यामुळे ते विषयांच्या विभागालाही जाणत नाहीत आणि स्वयंच्या विभागालाही जाणत नाहीत अर्थात् भोगांचा संयोग-वियोग वेगळा आहे आणि स्वयंही वेगळा आहे—हे जाणत नाहीत.

सातव्यापासून अकराव्या श्लोकापर्यंतच्या या प्रकरणात भगवान् हे सांगू इच्छितात की, माझा अंश जीवात्मा बिलकुल वेगळा आहे आणि ज्या सामग्रीला (शरीरादी पदार्थ आणि क्रिया याला) तो भ्रमाने आपली मानतो, ती बिलकुल वेगळी आहे—'**प्रकृतिस्थानि**'. सूर्य आणि आमावस्येच्या रात्रीसारखा दोन्हींचा विभागच वेग-वेगळा आहे. त्यांचा परस्पर संयोग होणे संभवतच नाही. जो उपर्युक्त जड आणि चेतन—दोन्हींच्या विभागाला संपूर्णपणे वेग-वेगळा पाहतो तोच ज्ञानी आणि योगी आहे. परंतु जो दोन्हींना मिसळलेले पाहतो, तो अज्ञानी आणि भोगी आहे.

*__संबंध__— पंधराव्या अध्यायात पाच पाच श्लोकांची चार प्रकरणे आहेत. त्यापैकी हे तिसरे प्रकरण बाराव्यापासून पंधराव्या श्लोकापर्यंत आहे. ज्यात सहावा श्लोक घेतल्यास पाच श्लोक पूर्ण होतात. हे तिसरे प्रकरण विशेषरूपाने भगवंताचा प्रभाव आणि महत्त्व प्रगट करणारे आहे. सहाव्या श्लोकात जो विषय (परमधामाला सूर्य, चंद्र आणि अग्री प्रकाशित करू शकत नाहीत) स्पष्ट होऊ शकला नव्हता त्याचेच स्पष्ट विवेचन आता भगवान् पुढील श्लोकात करत आहेत.*

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम्।**
**यच्चन्द्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम्॥ १२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **आदित्यगतम्** | = सूर्याला प्राप्त झालेले | **भासयते** | = प्रकाशित करते (आणि) | **अग्नौ** | = अग्नीत आहे, |
| **यत्** | = जे | **यत्** | = जे तेज | **तत्** | = ते |
| **तेज:** | = तेज | **चन्द्रमसि** | = चंद्रमात आहे | **तेज:** | = तेज |
| **अखिलम्** | = संपूर्ण | **च** | = तसेच | **मामकम्** | = माझेच आहे |
| **जगत्** | = जगताला | **यत्** | = जे तेज | **विद्धि** | = असे जाण. |

*व्याख्या*— [प्रभाव आणि महत्त्व ह्याकडे आकर्षित होणे हा जीवाचा स्वभाव आहे. प्राकृत पदार्थांच्या संबंधाने जीव प्राकृत पदार्थांच्या प्रभावाने प्रभावित होत असतो. कारण प्रकृतीमध्ये स्थित असल्याकारणाने जीवाला प्राकृत पदार्थांचे (शरीर, स्त्री, पुत्र, धन इत्यादी) महत्त्व दिसू लागते, भगवंताचे नव्हे. म्हणून जीवावर प्राकृत पदार्थांचा पडलेला प्रभाव हटविण्यासाठी भगवान् आपल्या प्रभावाचे वर्णन करून हे रहस्य प्रगट करतात की, त्या प्राकृत पदार्थांमध्ये जो प्रभाव आणि महत्त्व दिसून येत आहे, ते वास्तविक (मूळात) माझेच आहे, त्यांचे नव्हे. सर्वोपरी प्रभावशाली मीच आहे. माझ्याच प्रकाशाने सर्व प्रकाशित होत आहेत]

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम्**—जसे भगवंतांनी (२।५५ मध्ये) कामनांना "**मनोगतान्**" म्हटले आहे, तसेच येथे तेजाला "**आदित्यगतम्**" म्हणतात. तात्पर्य मनात स्थित असलेल्या कामना जशा मनाचा धर्म किंवा स्वरूप नसून आगन्तुक आहेत, तसेच सूर्यात स्थित असलेले जे तेज सूर्याचा धर्म अथवा स्वरूप नसून आगन्तुक आहे अर्थात् ते तेज सूर्याचे आपले नसून (भगवंतापासून) आलेले आहे.

सूर्याचे तेज (प्रकाश) इतके महान् आहे की, संपूर्ण ब्रह्मांड त्याच्याद्वारा प्रकाशित होते. असे हे तेज सूर्याचे दिसत असले तरी वास्तविक भगवंताचेच आहे. म्हणून सूर्य भगवंताला अथवा त्यांच्या परमधामाला प्रकाशित करू शकत नाही. महर्षी पातञ्जलि म्हणतात—

**पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्॥**

(योगदर्शन १।२६)

"ईश्वर सर्वांच्या पूर्वजांचाही गुरू आहे कारण त्याचा काळाने अवच्छेद होत नाही."

संपूर्ण भौतिक जगतात सूर्यासारखा प्रत्यक्ष प्रभावशाली पदार्थ कोणताही नाही. चंद्र, अग्नी, तारे, विद्युत इत्यादी जितके काही प्रकाशमान पदार्थ आहेत, ते सर्व सूर्यापासूनच प्रकाश प्राप्त करतात. भगवंताकडून मिळालेल्या प्रकाशाने जर सूर्य इतका विलक्षण आणि प्रभावशाली आहे, तर मग स्वतः भगवान् किती विलक्षण आणि प्रभावशाली असतील? असा विचार केला तर आपोआप भगवंताकडे आकर्षण होते.

सूर्य नेत्रांची अधिष्ठात्री देवता आहे. म्हणून डोळ्यात जो प्रकाश (पाहण्याची शक्ती) आहे, तोही परंपरेने भगवंताकडूनच आलेला आहे असे समजावे.

**यच्चन्द्रमसि**—जसे सूर्यामध्ये स्थित असलेल्या प्रकाशिका शक्ती आणि दाहिका शक्ती—दोन्हीही भगवंतापासून प्राप्त (आगत) झाल्या आहेत, तसेच चंद्राची प्रकाशिका शक्ती आणि पोषण शक्ती दोन्हीही (सूर्याकडून प्राप्त झाल्या असल्या तरी परंपरेने) भगवत्प्रदत्तच आहेत. जसे भगवंताचे तेज "आदित्यगत" आहे तसेच त्यांचे तेज "चंद्रगत" च समजावे. चंद्रात प्रकाशाबरोबर शीतलता, मधुरता, पोषणता, इत्यादी जे काही गुण आहेत, तो सर्व भगवंताचाच प्रभाव आहे.

येथे चंद्राला, तारे, नक्षत्र इत्यादीचेही उपलक्षण समजावे.

चंद्र मनाची अधिष्ठात्री देवता आहे. म्हणून मनात जो प्रकाश (मनन करण्याची शक्ती) आहे, तोही परंपरेने भगवंतापासूनच आलेला समजावा.

**यच्चाग्नौ**—जसे भगवंताचे तेज "आदित्यगत" आहे, तसेच त्यांचे तेज "अग्निगत" समजावे. तात्पर्य अग्नीची प्रकाशिका शक्ती आणि दाहिका शक्ती दोन्ही भगवंताच्याच आहेत, अग्नीच्या नव्हे.

येथे अग्नीला विद्युत, दीपक, काजवा, इत्यादींचेही उपलक्षण समजावे.

अग्नी "वाणी" ची अधिष्ठात्री देवता आहे. म्हणून वाणीमध्ये जो प्रकाश (अर्थप्रकाश करण्याची शक्ती) आहे, तीही परंपरेने भगवंतापासूनच आलेली समजावी.

**तत्तेजो विद्धि मामकम्**—जे तेज सूर्य, चंद्र आणि अग्नीमध्ये आहे आणि जे तेज या तिन्हींच्या प्रकाशाने प्रकाशित इतर पदार्थां (तारे, नक्षत्र, विद्युत, काजवा इत्यादीत) मध्ये पाहण्यात तसेच ऐकण्यात येते, त्याला भगवंताचेच समजावे.

उपर्युक्त पदांनी भगवान् हे म्हणत आहेत की, मनुष्य ज्या ज्या तेजस्वी पदार्थाकडे आकर्षित होतो, त्या त्या पदार्थामध्ये त्याला माझाच प्रभाव दिसला पाहिजे. (१०।४१) जसे बुंदीच्या लाडूमध्ये जी गोडी असते, ती तिची स्वतः ची नसून साखरेचीच आहे तसेच सूर्य, चंद्र आणि अग्नीत जे तेज आहे, ते त्यांचे स्वतःचे नसून भगवंताचेच आहे. भगवंताच्या प्रकाशानेच हे संपूर्ण जगत् प्रकाशित होत असते. "**तस्य भासा सर्वमिदं विभाति**" (कठोपनिषद २।२।१५), हा संपूर्ण ज्योतींचीही ज्योती आहे–"**ज्योतिषामपि तज्ज्योतिः**" (१३।१७)

सूर्य, चंद्र आणि अग्नी क्रमाने नेत्र, मन आणि वाणीच्या अधिष्ठाते व त्यांना प्रकाशित करणारे आहेत. मनुष्य आपले भाव प्रगट करण्यासाठी आणि समजून घेण्यासाठी नेत्र, मन (अंतःकरण) आणि वाणी या तीन इंद्रियांचाच उपयोग करत असतो. हे तीन इंद्रिये जितका प्रकाश करतात, तितका प्रकाश

इतर इंद्रिये करत नाहीत. प्रकाशाचे तात्पर्य वेगवेगळे ज्ञान करविणे. नेत्र आणि वाणी बाह्य करण आहेत तसेच मन आतील करण आहे. करणाकडून वस्तूचे ज्ञान होत असते. हे तिन्हीही करण (इंद्रिये) भगवंताला प्रकाशित करू शकत नाहीत, कारण यांच्यात जे तेज अथवा प्रकाश आहे ते यांचे स्वत:चे नसून भगवंताचेच आहे.

**परिशिष्ट भाव**—परमात्माच सर्व शक्तींचे मूळ आहेत. या विषयात केनोपनिषदातील एक कथा आहे. एक वेळ परमात्म्याने देवतांसाठी असुरांवर विजय मिळविला परंतु या विजयात देवतांनी आपल्या शक्तीचा अभिमान केला. ते समजू लागले की, आम्हीच आमच्या शक्तीने असुरांवर विजय मिळविला. देवतांचा हा अभिमान नष्ट करण्यासाठी परमात्म्याने यक्षाचे रूप धारण करून त्यांच्या समोर प्रगट झाले. यक्षाला पाहून देवतालोक आश्चर्यचकित होऊन विचार करू लागले की, हा यक्ष कोण आहे? त्याचा परिचय करून घेण्यासाठी देवतांनी अग्निदेवाला त्याच्याकडे पाठवले. यक्षाने विचारल्यावर अग्निदेव म्हणाले की, मी 'जातवेदा' नावाने प्रसिद्ध असलेली अग्निदेवता आहे आणि मी जर इच्छिल तर पृथ्वीत जे काही आहे त्या सर्वाला जाळून भस्म करू शकतो. तेव्हा यक्षाने त्याच्यासमोर एक काडी ठेवली आणि म्हटले की, तू या काडीला जाळून टाक. अग्निदेव आपली पूर्ण शक्ती लावूनही त्या काडीला जाळू शकला नाही. तो खाली मान घालून देवतांजवळ परत गेला आणि म्हणाला की, तो यक्ष कोण आहे—हे मी जाणू शकलो नाही. मग देवतांनी वायुदेवतेला यक्षाकडे पाठवले. यक्षाने विचारल्यावरुन वायुदेवाने म्हटले की, मी 'मातरिश्वा' नावाने प्रसिद्ध असलेली वायुदेवता आहे आणि मी जर इच्छिल तर पृथ्वीत जे काही आहे, त्या सर्वाला उडवू शकतो. त्यावेळी यक्षाने त्याच्या समोरही एक काडी ठेवली आणि म्हटले की, तू ही काडी उडव. वायुदेव आपली पूर्ण शक्ती लावूनही ती काडी उडवू शकला नाही. तो खाली मान घालून देवतांजवळ परत आला आणि म्हणाला की, मी त्या यक्षाला जाणू शकलो नाही. तेव्हा देवतांनी इंद्राला त्या यक्षाचा परिचय जाणण्यासाठी पाठविले परंतु इंद्र तेथे पोहचताच यक्ष अंतर्धान झाला आणि त्या जागी हिमाचल कुमार उमादेवी, प्रकट झाली. इंद्राने विचारल्यावर उमादेवीने म्हटले की, स्वयं परमात्माच तुम्हा लोकांचा अभिमान दूर करण्यासाठी यक्षरूपाने प्रगट झाले होते. तात्पर्य हे आहे की, सृष्टीत जी काही बलवत्ता, विशेषता, विलक्षणता दिसून येते, ती सर्व परमात्म्यापासूनच आलेली आहे (गीता दहाव्या अध्यायाचा एकेचाळीसावा श्लोक).

*संबंध—दृश्य (दिसणाऱ्या) पदार्थांत आपला प्रभाव दाखविल्यानंतर आता भगवान् पुढील श्लोकात ज्या शक्तीने समष्टी-जगतात क्रिया होत आहेत, त्या समष्टी शक्तीमध्ये आपला प्रभाव प्रगट करतात.*

## गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा।
## पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः॥ १३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अहम् च** | = मीच | | प्राण्यांना | **भूत्वा** | = होऊन |
| **गाम्** | = पृथ्वीत | **धारयामि** | = धारण करतो | **सर्वाः** | = समस्त |
| **आविश्य** | = प्रविष्ट होऊन | **च** | = आणि (मीच) | **औषधिः** | = औषधींना (वनस्पतींना) |
| **ओजसा** | = आपल्या शक्तीने | **रसात्मकः** | = रसस्वरूप | | |
| **भूतानि** | = समस्त | **सोमः** | = चंद्रमा | **पुष्णामि** | = पुष्ट करतो. |

*व्याख्या*—**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा**—भगवंतच पृथ्वीमध्ये प्रवेश करून तिच्यावर असलेल्या संपूर्ण स्थावर-जंगम प्राण्यांना धारण करतात. तात्पर्य पृथ्वीत जी धारणा-शक्ती आहे ती पृथ्वीची स्वत:ची नसून भगवंताचीच आहे.*

वैज्ञानिकही या गोष्टीचा स्वीकार करतात की, पृथ्वी-

* (१) द्यौः सचन्द्रार्कनक्षत्रा खं दिशो भूर्महोदधिः। वासुदेवस्य वीर्येण विधृतानि महात्मनः॥ (महाभारत अनु० १४९।१३४)
"स्वर्ग, सूर्य, चंद्र तसेच नक्षत्रसहित आकाश, दहादिशा, पृथ्वी आणि महासागर—हे सर्व भगवान् वासुदेवाच्या शक्तीने धारण केलेले आहेत."

(२) पृथिव्यां तिष्ठन् यो यमयति महीं वेद न धरा यमित्यादौ वेदो वदति जगतामीशममलम्।
नियन्तारं ध्येयं मुनिसुरनृणां मोक्षदमसौ शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः॥

(शंकराचार्य कृत कृष्णाष्टकम्)

"पृथ्वीत राहून जे पृथ्वीचे नियमन करतात, परंतु पृथ्वी ज्यांना जाणत नाही, "यः पृथिव्यां तिष्ठन् पृथ्वीं यमयति यं पृथिवी न वेद" इत्यादी श्रुतींनी वेद ज्या अमलस्वरूपाला जगताचा स्वामी, नियामक, ध्येय आणि देवता, मनुष्य, तसेच मुनिजनांना मोक्ष देणारा असल्याचे सांगतात, ते शरणागत वत्सल निखिल भुवनेश्वर श्रीकृष्णचंद्र माझ्या डोळ्यांचे विषय होवोत."

पेक्षा पाण्याचा स्तर उंच आहे आणि पृथ्वीवर पाण्याचा भाग जमीनीपेक्षा खूपच जास्त आहे.* असे असूनही पृथ्वी जलमय होत नाही. हा भगवंताच्या धारण शक्तीचा प्रभाव आहे.

पृथ्वीच्या उपलक्षणाने हे समजून घ्यावे की पृथ्वी-शिवाय जेथे कोठे धारण शक्ती दिसून येईल, ती सर्व भगवंताचीच आहे. पृथ्वीत असलेली अन्नोत्पादक शक्ती आणि गुरुत्वाकर्षण शक्तीही भगवंताचीच समजावी.

**पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः** — चंद्रात दोन शक्ती आहेत. प्रकाशिका शक्ती आणि पोषण शक्ती. प्रकाशिका शक्तीमध्ये आपल्या प्रभावाचे वर्णन पूर्व श्लोकात केल्यानंतर आता भगवान् या श्लोकात चंद्राच्या पोषण शक्तीमध्ये आपला प्रभाव सांगतात की, चंद्राच्या माध्यमातून संपूर्ण वनस्पतींना मीच पुष्ट करतो.

चंद्र शुक्लपक्षात पोषक आणि कृष्णपक्षात शोषक असतो. शुक्लपक्षात रसमय चंद्राच्या मधुर किरणांनी अमृत वर्षा होत असल्यामुळेच लता-वृक्ष पुष्ट होतात आणि सुपुष्पित आणि सुफलित होतात. मातेच्या उदरात स्थित असलेला शिशुही शुक्लपक्षात वृद्धीला प्राप्त होतो.

येथे "**सोमः**" पद चंद्रलोकाचा वाचक आहे, चंद्र मंडळाचा नव्हे. नेत्रांनी जे आपण पाहतो ते चंद्रमडळ आहे. चंद्रमंडळापेक्षाही वर (डोळ्याला न दिसणारा) चंद्रलोक आहे. उपर्युक्त पदामध्ये विशेषरूपाने "**सोमः**" पद देण्याचा अभिप्राय असा आहे की, चंद्रामध्ये प्रकाशाबरोबर अमृत वर्षाव करण्याचीही शक्ती आहे. ते अमृत अगोदर चंद्रलोकातून चंद्रमंडळात येत असते आणि मग चंद्रमंडळातून भूमंडळावर येत असते.

येथे "**औषधीः**" पदाच्या अंतर्गत गहू, हरबरा इत्यादी सर्व प्रकारची अन्ने समजावीत. चंद्राकडून पुष्ट झालेल्या अन्नाचे सेवन केल्याने मनुष्य, पशू, पक्षी इत्यादी सर्व प्राण्यांना पुष्टी मिळते. औषधीत आणि वनस्पतीत शरीराला पुष्ट करण्याची जी शक्ती आहे, ती चंद्राकडून येत असते. चंद्राची ती पोषण शक्तीही त्याची स्वतःची नसून भगवंताचीच आहे. भगवंतच चंद्राला निमित्त करून सर्वांचे पोषण करीत असतात.

**परिशिष्ट भाव**—पृथ्वी, चंद्रमा, इत्यादी सर्व भगवंताची अपरा-प्रकृती आहे (गीता—सातव्या अध्यायाचा चवथा श्लोक). म्हणून हिचे धारक, उत्पादक, पालक, संरक्षक, प्रकाशक इत्यादी सर्व काही भगवान्‌च आहेत. भगवंताची शक्ती असल्यामुळे अपरा-प्रकृती भगवंताशी अभिन्न आहे.

येथे 'सोम' शब्द चंद्रलोकाचा वाचक आहे, जो सूर्याच्याही वर आहे.†

***संबंध**—समष्टी शक्तीमध्ये आपला प्रभाव सांगितल्यानंतर आता भगवान् ज्या शक्तीने व्यष्टी जगतात क्रिया होत आहेत, त्या व्यष्टी-शक्तीमध्ये आपला प्रभाव सांगतात.*

## अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः।
## प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम्॥ १४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **प्राणिनाम्** | = प्राण्यांच्या | **प्राणापान** | = प्राण आणि अपान | **भूत्वा** | = होऊन |
| **देहम्** | = शरीरात | **समायुक्तः** | यांनी युक्त | **चतुर्विधम्** | = चार प्रकारची |
| **आश्रितः** | = राहणारा | **वैश्वानरः** | = वैश्वानर | **अन्नम्** | = अन्ने |
| **अहम्** | = मी | | (जठराग्नी) | **पचामि** | = पचवितो. |

*व्याख्या*—**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः**— बाराव्या श्लोकात अग्नीच्या प्रकाशन शक्तीमध्ये आपल्या प्रभावाचे वर्णन केल्यानंतर भगवान् या श्लोकात वैश्वानररूपी अग्नीच्या पाचन शक्तीमध्ये आपल्या प्रभावाचे वर्णन करीत आहेत.‡ तात्पर्य अग्नीचे दोन्हीही कार्य (प्रकाश करणे आणि पचविणे) भगवंताच्याच शक्तीने होत असतात.

प्राण्यांच्या शरीरांना पुष्ट करणे तसेच त्यांचे प्राण रक्षण करण्यासाठी भगवंतच वैश्वानर (जठराग्नी) या रूपाने त्या प्राण्यांच्या शरीरात राहतात. मनुष्याप्रमाणे लता, वृक्ष इत्यादी स्थावर आणि पशू, पक्षी इत्यादी जंगम प्राण्यातही वैश्वानराची पाचनशक्ती काम करते. लता, वृक्ष इत्यादी जे खाद्य, पाणी ग्रहण करतात, पाचनशक्तीद्वारा त्यांचे पाचन

* पृथ्वीवर एकूण जलाचा भाग सुमारे एकाहत्तर प्रतिशत आणि जमीनीचा एकूण भाग सुमारे एकोणतीस प्रतिशत मानला जातो.

† न विदुः सोम ते मायां ये च नक्षत्रयोनयः। त्वमादित्यपथादूर्ध्वं ज्योतिषां चोपरिस्थितः॥ (पद्मपुराण, सृष्टि० ४१। १२८)।

‡ "अयमग्निर्वैश्वानरो योऽयमन्तः पुरुषे येनेदमन्नं पच्यते यदिदमद्यते" (बृहदारण्यक० ५।९।१)

जो हा पुरुषाच्या आत अग्नी आहे, हा वैश्वानर आहे, अन्न जे भक्षण केले जाते, त्याच्याकडून ते अन्न पचविले जाते.

होऊन परिणामी त्या लता वृक्षादींची वाढ होत असते.

**प्राणापानसमायुक्तः**—शरीरामध्ये प्राण, अपान, समान, उदान आणि व्यान—हे पाच प्रधान वायू आणि नाग, कूर्म, कूकर, देवदत्त आणि धनञ्जय हे पाच उपप्रधान वायू राहतात.* या श्लोकात भगवान् दोन प्रधान वायू—प्राण आणि अपान यांचेच वर्णन करीत आहेत कारण हे दोन्ही वायू जठराग्नीला प्रदीप्त करतात. जठराग्नीने पचविलेल्या भोजनाच्या सूक्ष्म अंशाला अथवा रसाला शरीराच्या प्रत्येक अंगामध्ये पोहचविण्याचे सूक्ष्म कार्यही प्रामुख्याने प्राण आणि अपान वायूचेच आहे.

**पचाम्यन्नं चतुर्विधम्**—प्राणी चार प्रकारच्या अन्नाचे भोजन करतात.

(१) **भोज्य**—जे अन्न दातांनी चावून खाल्ले जाते, जसे पोळी-भाकरी वगैरे.

(२) **पेय**—जे अन्न गिळले जाते जसे दूध, रस, खीर इत्यादी.

(३) **चोष्य**—दातांनी चावून ज्या खाद्य पदार्थांचा रस चोखला जातो आणि शिल्लक राहिलेल्या असार भागाला टाकून दिले जाते—जसे ऊस, आंबा इत्यादी. वृक्षादी स्थावर योनी याच प्रकारच्या अन्नाला ग्रहण करतात.

(४) **लेह्य**—जे अन्न जिभेने चाटले जाते. जसे चटणी मध इत्यादी.

अन्नाच्या उपर्युक्त चार प्रकारापैकीही एकेकाचे अनेक भेद आहेत. भगवान् म्हणतात की, त्या चार प्रकारच्या अन्नांना वैश्वानर (जठराग्नी) रूपाने मीच पचवितो. अन्नाचा कोणताही असा अंश नाही जो माझ्या शक्तीशिवाय पचू शकतो.

**परिशिष्ट भाव**—पृथ्वीत प्रविष्ट होऊन संपूर्ण प्राण्यांना धारण करणे, चंद्रमा होऊन संपूर्ण वनस्पतींचे पोषण करणे, त्यानंतर त्यांना खाणाऱ्या प्राण्यांच्या शरीरात जठराग्नी होऊन खाल्लेल्या अन्नाला पचविणे इत्यादी संपूर्ण कार्य भगवंताच्याच शक्तीने होते. परंतु मनुष्य ती कार्य आपल्याद्वारा केली जाणारी मानून फुकटच अभिमान करतो—'**अहं करोमीति वृथाभिमानः**'. जसे बैलगाडीच्या खाली चालणारा कुत्रा समजतो की, बैलगाडी मीच चालवित आहे.

*संबंध—मागील तीन श्लोकांत आपल्या प्रभावयुक्त विभूतींचे वर्णन करून आता त्या विषयाचा उपसंहार, भगवान् सर्व प्रकाराने ज्ञातव्य तत्त्व स्वतःच असल्याचे सांगून, करीत आहेत.*

## सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च।
## वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम्॥ १५॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अहम्, च** | = मीच | **च** | = तसेच | **च** | = आणि |
| **सर्वस्य** | = संपूर्ण प्राण्यांच्या | **मत्तः** | = माझ्याद्वारा (च) | **अपोहनम्** | = अपोहन (संशयादी दोषांचा नाश) होतो. |
| **हृदि** | = हृदयात | **स्मृति** | = स्मृती, | | |
| **सन्निविष्टः** | = स्थित आहे | **ज्ञानम्** | = ज्ञान | **सर्वैः** | = संपूर्ण |

* या दहाही प्राण वायूंची वेगवेगळी कार्ये पुढील प्रमाणे आहेत—

| क्रम | वायू | निवास स्थान | कार्य |
|---|---|---|---|
| १ | प्राण | हृदय | श्वास बाहेर काढणे, अन्न पचविणे इत्यादी. |
| २ | अपान | गुदा | श्वास आत घेणे, मलमूत्र बाहेर काढणे, गर्भ बाहेर काढणे इत्यादी. |
| ३ | समान | नाभी | पचविलेल्या अन्नाचा रस सर्वांगामध्ये वाटून देणे, पोहचविणे. |
| ४ | उदान | कण्ठ | जेव्हा भोजन करतो तेव्हा अन्नाचा घट्टभाग व जलभाग वेगवेगळा करणे, सूक्ष्मशरीर स्थूलशरीराच्या बाहेर काढणे, त्याला दुसऱ्या शरीरात किंवा दुसऱ्या लोकात घेऊन जाणेसुद्धा याचे कार्य आहे. |
| ५ | व्यान | संपूर्ण शरीर | शरीर व त्याची अंगे यांना संकुचित करणे किंवा फैलाविणे. |
| ६ | नाग | | ढेकर देणे. |
| ७ | कूर्म | - | डोळ्यांची उघडझाप करणे. |
| ८ | कूकर | - | शिंक देणे. |
| ९ | देवदत्त | - | जांभई देणे. |
| १० | धनञ्जय | - | हा मृत्यूनंतर देखील शरीरात राहतो, त्यामुळे मृतशरीर फुगून जाते. |

वास्तविक एकाच प्राणवायूच्या वेगवेगळ्या कार्यानुसार त्याचे वरील प्रकार मानले गेले आहेत.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **वेदैः** | = वेदांद्वारा | **वेदान्तकृत्** | = वेद तत्त्वाचा निर्णय करणारा | **वेदवित्, एव** | = वेदांना जाणणाराही |
| **अहम् एव** | = मीच | **च** | = आणि | **अहम्** | = मी (च आहे). |
| **वेद्यः** | = जाणण्यायोग्य आहे. | | | | |

*व्याख्या*— **सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टः** *—मागील श्लोकात आपल्या विभूतींचे वर्णन केल्यानंतर आता भगवान् हे रहस्य प्रगट करतात की, मी स्वतः सर्व प्राण्यांच्या हृदयात विद्यमान असतो. जरी शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी सर्व स्थानात भगवान् विद्यमान आहेत तरीपण हृदयात ते विशेषरूपाने विद्यमान आहेत.

हृदय शरीराचे प्रधान अंग आहे. सर्व प्रकारचे भाव हृदयातच होत असतात. सर्व कर्मात भावच प्रधान असतो. भावाच्या शुद्धीने सर्व पदार्थ, क्रिया इत्यादीची शुद्धी होत असते. म्हणून महत्त्व भावाचेच आहे, वस्तू, व्यक्ती, कर्म इत्यादीचे नव्हे. तो भाव हृदयात राहत असल्याने हृदयाचे फार महत्त्व आहे. हृदय सत्त्वगुणाचे कार्य आहे. म्हणूनच भगवान् हृदयात विशेषरूपाने राहतात.

भगवान् म्हणतात की, मी प्रत्येक मनुष्याच्या अत्यंत जवळ त्याच्या हृदयात राहत असतो, म्हणून कोणत्याही साधकाने (माझ्या दूरत्वाचा अथवा वियोगाचा अनुभव करत असूनही) माझ्या प्राप्तीविषयी निराश होऊ नये. म्हणून पापी-पुण्यात्मा, मूर्ख-पण्डित, निर्धन-धनवान, रोगी-निरोगी इत्यादी कोणताही स्त्री-पुरुष, कोणत्याही जाती, वर्ण, सांप्रदाय, आश्रम, देश, काळ, परिस्थिती इत्यादीचा का असेना, भगवत्प्राप्तीचा तो पूर्ण अधिकारी आहे. आवश्यकता केवळ भगवत्प्राप्तीच्या तीव्र अभिलाषा, उत्कंठा, व्याकूळतेची आहे की, जिच्यामध्ये भगवत्प्राप्तीवाचून जगणे [अशक्य होईल.]

परमात्मा सर्वव्यापी अर्थात् सर्व ठिकाणी समान रूपाने परिपूर्ण असूनही हृदयात प्राप्त होतात. जसे गायीच्या संपूर्ण शरीरात दूध व्याप्त असूनही ते तिच्या स्तनातूनच प्राप्त होत असते अथवा पृथ्वीत सर्वत्र पाणी राहत असूनही ते आड, विहीर येथूनच प्राप्त होते, तसेच सूर्य, चंद्र, अग्नी, पृथ्वी, वैश्वानर, इत्यादी सर्वात व्याप्त असूनही परमात्मा हृदयात प्राप्त होतात. (१३।१७,१८।६१)

## परमात्मप्राप्तीसंबंधी विशेष गोष्ट

हृदयात निरंतर स्थित असल्याकारणाने परमात्मा वास्तविक प्रत्येक मनुष्याला प्राप्त आहेत. परंतु जडतेशी (संसार) मानलेल्या संबंधाने, जडतेकडेच दृष्टी असल्याकारणाने नित्यप्राप्त परमात्मा अप्राप्त प्रतीत होत आहेत अर्थात् त्यांच्या प्राप्तीचा अनुभव येत नाही. जडतेशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद होताच सर्वत्र विद्यमान (नित्यप्राप्त) परमात्मतत्त्व आपोआप अनुभवात येते.

परमात्मप्राप्तीसाठी जे सत्-कर्म, सत्-चर्चा आणि सत्-चिंतन केले जाते, त्यात जडतेचा (असत्) आश्रय राहतच असतो. कारण जडतेचा (स्थूल, सूक्ष्म आणि कारण-शरीर) आश्रय घेतल्याशिवाय हे होणे संभवतच नाही. वास्तविक यांची सार्थकता जडतेशी संबंध-विच्छेद करविण्यातच आहे. जेव्हा हे (सत्-कर्म, सत्-चर्चा, आणि सत् चिंतन) केवळ संसाराच्या हितासाठीच केले जाईल, आपल्यासाठी नव्हे, तेव्हाच जडतेशी संबंध-विच्छेद होईल.

एखाद्या विशेष साधन, गुण, योग्यता, लक्षण इत्यादींच्या मोबदल्यात परमात्मप्राप्ती होईल—ही धारणा अत्यंत चूकीची आहे. एखाद्या मूल्याच्या मोबदल्यात जी वस्तू प्राप्त होते, ती त्या मूल्यापेक्षा कमी मूल्याची असते—असा सिद्धांत आहे. म्हणून जर एखाद्या विशेष साधन,योग्यता इत्यादीच्या द्वाराच परमात्मप्राप्तीचे होणे मानले जाईल, तर परमात्मा त्या साधन, योग्यता इत्यादीपेक्षा कमी मूल्याचेच (कमकुवत) सिद्ध होतील. परंतु परमात्मा कशाहूनही कमी मूल्याचे नाहीत. (११।४३). म्हणून ते एखाद्या साधन इत्यादीने खरीदले जाऊ शकत नाहीत. याशिवाय जर एखाद्या मूल्याच्या (साधन, योग्यता इत्यादी) मोबदल्यात परमात्म्याची प्राप्ती मानली गेली, तर त्यांच्यापासून आपल्याला लाभच काय होणार आहे? कारण त्यांच्यापेक्षा अधिक मूल्याची वस्तू (साधन इत्यादी) तर आपल्याजवळ पूर्वीपासून आहेच!

जसे सांसारिक पदार्थ कर्मांनी प्राप्त होतात, तसे परमात्म्याची प्राप्ती कर्मांमुळे होत नाही. कारण परमात्मप्राप्ती एखाद्या कर्माचे फल नाही. प्रत्येक कर्माची उत्पत्ती अहंभावाने होत असते आणि परमात्मप्राप्ती अहंभाव समाप्त झाल्यानंतर

* द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते। तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति॥

(मुण्डक० ३।१।१ श्वेताश्वतर: ४।६)

''नेहमी बरोबर राहणारे व परस्पर सख्यत्व राखणारे दोन पक्षी जीवात्मा व परमात्मा एकाच वृक्षाचा—शरीराचा आश्रय घेऊन राहतात. त्या दोघांपैकी एक (जीवात्मा) तर त्या वृक्षाच्या कर्मफलांचा स्वाद घेत घेत उपभोग घेतो, परंतु दुसरा (परमात्मा) त्यांचा उपभोग न घेता केवळ पाहत राहतो.''

होत असते. कारण अहंभाव कृती (कर्म) आहे आणि परमात्मा कृतिरहित आहेत. कृतिरहित तत्त्व एखाद्या कृतीने कसे प्राप्त केले जाऊ शकते ? "**नास्त्यकृतः कृतेन**" (मुण्डक १।२।१२) तात्पर्य, परमात्मतत्त्वाची प्राप्ती मन, बुद्धी शरीर, इंद्रिये इत्यादी जड पदार्थांने होत नाही, तर जडतेच्या त्यागाने होते. जोपर्यंत मन, बुद्धी, इंद्रिये, शरीर, देश, काळ, वस्तू इत्यादींचा आश्रय आहे, तोपर्यंत एका परमात्म्याचा आश्रय होऊ शकत नाही. मन, बुद्धी इत्यादींच्या आश्रयाने परमात्मप्राप्ती होईल हीच साधकाची मूळ चूक आहे. जर जडतेचा आश्रय आणि विश्वास सुटून एकमात्र परमात्म्याचाच आश्रय आणि विश्वास झाला तर परमात्मप्राप्तीत उशीर लागू शकत नाही.

**मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च**—एखाद्या विस्मरण झालेल्या गोष्टीची (एखाद्या कारणाने) पुन्हा माहिती प्राप्त होणे याला "स्मृती" म्हणतात. स्मृती आणि चिंतन या दोन्हीत फरक आहे. नवीन गोष्टीचे "चिंतन" आणि जुन्या गोष्टीची "स्मृती" होत असते. म्हणून चिंतन संसाराचे आणि स्मृती परमात्म्याची होत असते, कारण संसार पूर्वी नव्हता आणि परमात्मा पूर्वीपासूनच (अनादिकालापासून) आहेत. स्मृतीमध्ये जी शक्ती आहे ती चिंतनात नसते. स्मृतीमध्ये कर्तेपणाचा भाव कमी राहतो, परंतु चिंतनात कर्तेपणाचा भाव अधिक राहतो.

एक स्मृती केली जाते आणि दुसरी होत असते. जी स्मृती केली जाते ती "बुद्धी" मध्ये आणि जी स्मृती होत असते ती "स्व" मध्ये होत असते. होणारी स्मृती जडतेपासून तात्काळ संबंध-विच्छेद करविणारी असते. भगवान् येथे म्हणतात की, ही (होणारी) स्मृती माझ्यापासूनच होते.

परमात्म्याचा अंश असूनही जीव अज्ञानाने परमात्म्यापासून विमुख होतो आणि आपला संबंध संसाराशी मानू लागतो. या अज्ञानाचा नाश झाल्यावर "मी भगवंताचाच आहे संसाराचा नव्हे" असा साक्षात् अनुभव होणे हीच "स्मृती" आहे (१८।७३). स्मृतीत कोणते नवीन ज्ञान अथवा अनुभव नसतो, तर केवळ विस्मृतीचा (मोह) नाश होत असतो. भगवंताशी आपला वास्तविक संबंध आहे. या वास्तविकतेचे प्राकट्यच स्मृती आहे.

जीवामध्ये निष्कामभाव (कर्मयोग), स्वरूपबोध (ज्ञानयोग) आणि भगवत्प्रेम (भक्तियोग) हे तिन्ही आयतेच विद्यमान असतात. जीवाला (अनादिकालापासून) यांची विस्मृती झाली आहे. एक वेळ यांची स्मृती झाल्यास मग विस्मृती होत नाही, कारण ही स्मृती "स्व" मध्ये जागृत होत असते. "बुद्धी" त होणारी लौकिक स्मृती (बुद्धी क्षीण झाल्यावर) नष्टही होऊ शकते. परंतु "स्व" मध्ये होणारी स्मृती कधी नष्ट होत नाही.

एखाद्या विषयाच्या महितीला "ज्ञान" म्हणतात. लौकिक आणि पारमार्थिक जितके काही ज्ञान आहे, ते सर्व ज्ञान ज्ञानस्वरूपी परमात्म्याचा केवळ आभास आहे. म्हणून ज्ञानाला भगवान् आपल्यापासूनच होणारे सांगतात. वास्तविक ज्ञान तेच आहे जे "स्व" द्वारा जाणले जाते. अनंत, पूर्ण आणि नित्य असल्याकारणाने या ज्ञानात कोणता संशय अथवा भ्रम राहत नाही जरी इंद्रिय आणि बुद्धिजन्य ज्ञानही "ज्ञान" म्हटले जाते, तरीही हे सीमीत, अल्प (अपूर्ण) तसेच परिवर्तनशील असल्याकारणाने या ज्ञानात संशय आणि भ्रम राहत असतो. जसा सूर्य डोळ्याने पाहिला असता अत्यंत मोठा असूनही (आकाशात) लहानसा दिसतो इत्यादी. बुद्धीने जी गोष्ट, पूर्वी योग्य समजत होतो, बुद्धी विकसित अथवा शुद्ध झाल्यावर, तीच चुकीची वाटू लागते. तात्पर्य इंद्रिये आणि बुद्धिजन्य ज्ञान करणसापेक्ष आणि अल्प असते. अल्प ज्ञानच "अज्ञान" म्हटले जाते. या उलट "स्व" चे ज्ञान कोणत्याही करणाची (इंद्रिय, बुद्धी इत्यादी) अपेक्षा ठेवीत नाही आणि ते नेहमी पूर्ण असते. वास्तविक इंद्रिय आणि बुद्धिजन्य ज्ञानही "स्व" च्या ज्ञानाने प्रकाशित होत असतात अर्थात् सत्ता प्राप्त करतात.

संशय, भ्रम, विपर्यय (विपरीत भाव), तर्क, वितर्क इत्यादी दोष नाहीसे होणे याला "अपोहन" म्हणतात. भगवान् म्हणतात की, हे (संशय इत्यादी) दोषही माझ्या कृपेनेच समाप्त होतात.

शास्त्रांच्या गोष्टी सत्य आहेत का असत्य? भगवंताला कोणी पाहिले आहे? संसारच सत्य आहे इत्यादी संशय आणि भ्रम भगवंताच्या कृपेनेच समाप्त होतात. सांसारिक पदार्थामध्ये आपले हित दिसणे, त्यांच्या प्राप्तीत सुख वाटणे, प्रतिक्षण नष्ट होणाऱ्या संसाराची सत्ता दिसणे इत्यादी विपरीत भावही भगवंताच्या कृपेनेच समाप्त होतात. गीतोपदेशाच्या शेवटी अर्जुनानेही भगवंताच्या कृपेनेच आपल्या मोहाचा नाश, स्मृतीची प्राप्ती आणि संशयाचा नाश होणे स्वीकार केले आहे (१८।७३).

**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यः**—येथे "**सर्वैः**" पद वेद आणि वेदानुकूल संपूर्ण शास्त्रांचा वाचक आहे. संपूर्ण शास्त्राचे तात्पर्य, केवळ परमात्म्याचे वास्तविक ज्ञान करविण्यात अथवा त्यांची प्राप्ती करविण्यातच आहे.

येथे भगवान् ही गोष्ट स्पष्ट करतात की, वेदांचे वास्तविक तात्पर्य माझी प्राप्ती करविण्यातच आहे, सांसारिक

भोगांची प्राप्ती करविण्यात नव्हे. श्रुतीमध्ये सकामभावाचे विशेष वर्णन येण्याचे हेही कारण आहे की, संसारात सकाम मनुष्यांची संख्या अधिक असते. म्हणून श्रुती (सर्वांची माता असल्याने) त्यांचेही पालन करीत असते.

जाणून घेण्यालायक केवळ एक परमात्माच आहे, ज्यांना जाणून घेतल्यानंतर मग काहीही जाणून घेणे शिल्लक राहत नाही. परमात्म्याला जाणून घेतल्याशिवाय संसाराला कितीही जाणून घेतले तरी जाणणे कधीही पूर्ण होत नाही, नेहमीसाठी अधूरेच राहते.* अर्जुनामध्ये भगवंताला जाणून घेण्याची विशेष जिज्ञासा होती. म्हणूनच भगवान् म्हणतात की, संपूर्ण वेद आणि शास्त्र यांच्याद्वारा जाणून घेण्याला योग्य असणारा मी स्वत: तुझ्यासमोर बसलेला आहे.

**वेदान्तकृत्**—भगवंतापासूनच वेद प्रकट झाले आहेत (३।१५, १७।२३) म्हणून तेच वेदांच्या अंतिम सिद्धांताला योग्य रीतीने सांगून त्यात दिसून येणाऱ्या विरोधांचा चांगल्या प्रकारे समन्वय करू शकतात. म्हणून भगवान् म्हणतात की, (वेदांचा पूर्ण वास्तविक ज्ञाता असल्याकारणाने) मीच वेदांच्या यथार्थ तात्पर्याचा निर्णय करणारा आहे.

**वेदविदेव चाहम्**—वेदांचा अर्थ, भाव इत्यादींना भगवान्च यथार्थरूपाने जाणतात. वेदात कोणती गोष्ट कोणत्या भावाने अथवा उद्देशाने म्हटली गेली आहे, वेदांचे यथार्थ तात्पर्य काय आहे इत्यादी गोष्टी भगवंतच पूर्णरूपाने जाणतात, कारण भगवंतापासूनच वेद प्रकट झाले आहेत.

वेदांत भिन्न भिन्न विषय असल्याकारणाने मोठमोठे विद्वानसुद्धा एक निर्णय करू शकत नाहीत (२।५३) म्हणून वेदांचे यथार्थ ज्ञाता भगवंताचा आश्रय घेतल्यानेच ते वेदांचे तत्त्व जाणू शकतात आणि "श्रुतिविप्रतिपत्ति" पासून मुक्त होऊ शकतात.

या पंधराव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात भगवंतांनी संसारवृक्षाला तत्त्वाने जाणणाऱ्या मनुष्याला "वेदवित्" म्हटले होते. आता या श्लोकात भगवान् स्वत:ला "वेदवित्" म्हणतात. याचे तात्पर्य संसाराच्या यथार्थ तत्त्वाला जाणून घेणारा महापुरुष भगवंताशी अभिन्न होतो. संसाराच्या यथार्थ तत्त्वाला जाणून घेण्याचा अभिप्राय, "संसाराची स्वतंत्र सत्ता नाही आणि परमात्म्याचीच सत्ता आहे", असे जाणून संसाराशी मानलेला संबंध सोडून, आपला संबंध भगवंताशी जोडणे, संसाराचा आश्रय सोडून भगवंताच्या आश्रित होणे, हा आहे.

## प्रकरणसंबंधी विशेष विचार

भगवंतांनी श्रीमद्‌भगवद्गीतेच्या चार अध्यायामध्ये भिन्न भिन्नरूपाने आपल्या विभूतींचे वर्णन केले आहे.

सातव्या अध्यायाच्या आठव्या श्लोकापासून बाराव्या श्लोकापर्यंत सृष्टीच्या प्रधान प्रधान पदार्थांमध्ये कारणरूपाने सतरा विभूतींचे वर्णन करून भगवंतांनी आपली सर्व-व्यापकता आणि सर्वरूपता सिद्ध केली आहे.

नवव्या अध्यायामध्ये सोळाव्यापासून एकोणीसाव्या श्लोकापर्यंत क्रिया, भाव, पदार्थ, इत्यादीमध्ये कार्य-कारण-रूपाने सदतीस विभूतींचे वर्णन करून भगवंतांनी स्वत:ला सर्वव्यापक दाखविले आहे.

दहाव्या अध्यायाचे तर नावच "विभूतियोग" आहे. या अध्यायात चौथ्या आणि पाचव्या श्लोकात भगवंतांनी प्राण्यांच्या भावांच्या रूपात वीस विभूतींचे आणि सहाव्या श्लोकात व्यक्तींच्या रूपात पंचवीस विभूतींचे वर्णन केले आहे. त्यानंतर वीसाव्यापासून एकोणचाळीसाव्या श्लोका-पर्यंत भगवंतांनी ब्यांशी प्रधान विभूतींचे विशेषरूपाने वर्णन केले आहे.

या पंधराव्या अध्यायात बाराव्यापासून पंधराव्या श्लोकापर्यंत भगवंतांनी आपला प्रभाव दाखविण्यासाठी तेरा विभूतींचे वर्णन केले आहे.†

उपर्युक्त चारही अध्यायात भिन्न भिन्न रूपात विभूतींचे वर्णन करण्याचे तात्पर्य, साधकाला "**वासुदेवः सर्वम्**" (७।१९) "सर्व काही वासुदेवच आहे" या तत्त्वाचा अनुभव यावा, हे आहे. म्हणूनच आपल्या विभूतींचे वर्णन करतेवेळी भगवंतांनी आपल्या सर्व व्यापकतेलाच विशेषरूपाने सिद्ध केले आहे. जसे—

"**मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति**" (७।७) "माझ्या-पेक्षा श्रेष्ठ या जगताचे दुसरे कोणतेही महान् कारण नाही"

"**सदसच्चाहमर्जुन**" (९।१९) "सत् आणि असत् सर्व काही मीच आहे"

"**अहं सर्वस्य प्रभवो मत्तःसर्वं प्रवर्तते**" (१०।८)

---

* साङ्गोपाङ्गानपि यदि यश्च वेदानधीयते। वेदवेद्यं न जानीते वेदभारवहो हि सः॥ (महाभारत० शांती० ३१८।५०)

"सांगोपांग वेद शिकूनही, जो वेदांनी जाणण्यास योग्य परमात्म्याला जाणत नाही. तो मूढ केवळ वेदांचे ओझे वाहणारा आहे."

† या अध्यायात वर्णिलेल्या तेरा विभूती अशा आहेत—

(१) सूर्यात स्थित तेज (२) चंद्रस्थित तेज (३) अग्नीत स्थित तेज (४) पृथ्वीची धारणा शक्ती, (५) चंद्राची पोषण शक्ती (६) वैश्वानर (७) हृदयस्थित अंतर्यामी (८) स्मृती (९) ज्ञान (१०) अपोहन (११) वेदाद्वारा जाणण्या योग्य (१२) वेदान्ताचा कर्ता (१३) वेदांना जाणणारा.

''मीच सर्वांच्या उत्पत्तीचे कारण आहे आणि माझ्याकडूनच सर्व जगत् क्रियान्वित होते.''

**''न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम्''** (१०।३९) ''चर आणि अचर कोणताही प्राणी असा नाही की, जो मजरहित आहे अर्थात् चराचर सर्व प्राणी माझेच स्वरूप आहेत.''

त्याचप्रमाणे या पंधराव्या अध्यायातही आपल्या विभूतींच्या वर्णनाचा उपसंहार करताना भगवान् म्हणतात— ''**सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टः**'' (१५।१५) ''मी संपूर्ण प्राण्यांच्या हृदयामध्ये सम्यक् प्रकाराने स्थित आहे.''

तात्पर्य संपूर्ण प्राणी, पदार्थ परमात्म्याच्या सत्तेनेच सत्तावान् आहेत. परमात्म्याशिवाय कोणाचीही स्वतंत्र सत्ता नाही.

प्रकाशाच्या अभावात (अंधारात) कोणतीही वस्तू दिसत नाही. डोळ्यांनी एखादी वस्तू पाहताना प्रथम प्रकाश दिसतो त्यानंतर वस्तू दिसते अर्थात् प्रत्येक वस्तू प्रकाशान्तर्गतच दिसत असते. परंतु आपली दृष्टी प्रकाशावर न जाता प्रकाशित होणाऱ्या वस्तूवर जात असते. त्याचप्रमाणे यावन्मात्र वस्तू, क्रिया, भाव इत्यादींचे ज्ञान एका विलक्षण आणि अलुप्त प्रकाश-ज्ञानाच्या अंतर्गत असते, जे सर्वांचे प्रकाशक आणि आधार आहे. प्रत्येक वस्तूच्या अगोदर ज्ञान (स्वयंप्रकाश परमात्मतत्त्व) राहत असते. म्हणून संसारात परमात्मा व्याप्त आहे असे म्हटले तरी वास्तविक संसार नंतर असतो आणि त्याचे अधिष्ठान परमात्मतत्त्व प्रथम असते, अर्थात् प्रथम परमात्मतत्त्व दिसत असते, त्यानंतर संसार दिसतो. परंतु संसाराविषयी आसक्ती असल्याकारणाने मनुष्याची दृष्टी त्याच्या प्रकाशकावर (परमात्मतत्त्व) जात नाही.

परमात्म्याच्या सत्तेशिवाय संसाराला कोणतीच सत्ता नाही, परंतु परमात्मसत्तेकडे दृष्टी नसल्याकारणाने आणि सांसारिक प्राणी-पदार्थात सुखासक्ती असल्यामुळे त्या प्राणी-पदार्थांची स्वतंत्र सत्ता प्रतीत होते आणि परमात्म्याची वास्तविक सत्ता (जी तात्त्विकदृष्टीने असते) दिसत नाही. जर संसाराविषयीच्या आसक्तीचा अथवा सुखासक्तीचा संपूर्णपणे अभाव झाला, तर तत्त्वतः एक परमात्मसत्ताच दिसू लागेल अथवा तसा अनुभव येऊ लागेल. म्हणून विभूतींच्या वर्णनाचे तात्पर्य हे आहे की, कोणत्याही प्राणी पदार्थाकडे दृष्टी गेल्यास साधकाला केवळ भगवंताची स्मृती झाली पाहिजे अर्थात् त्याने प्रत्येक प्राणी पदार्थामध्ये भगवंतालाच पाहिले पाहिजे. (१०।४१)

सध्या समाजाची दशा फार विचित्र झाली आहे. प्रायः सर्व लोकांच्या अंतःकरणात पैशाचे फार महत्त्व वाढले आहे. रुपये स्वतः कामात येत नाहीत, तर त्यांनी खरेदी केलेल्या वस्तूच उपयोगात येतात. परंतु लोकांनी रुपयांच्या ह्या उपयोगाला विशेष महत्त्व न देता त्यांच्या संख्येच्या वृद्धीलाच जास्त महत्त्व दिले आहे. म्हणून ज्या मनुष्याजवळ जितके अधिक रुपये असतील, तो समाजात आपल्याला तितकाच अधिक मोठा मानतो.* अशा प्रकारे रुपयालाच महत्त्व देणारी व्यक्ती परमात्म्याचे महत्त्व समजूच शकत नाही. मग परमात्मप्राप्ती- शिवाय जगणे अशक्य व्हावे, अशी उत्कंठा त्या मनुष्याच्या अंतःकरणात उत्पन्नच कशी होऊ शकते ? ज्याची अशी ठाम समजूत झाली आहे की, रुपयावाचून राहणेच शक्य नाही अथवा रुपयावाचून काम चालूच शकत नाही, त्याची परमात्म्याविषयी एक निश्चयात्मिका बुद्धी होऊच शकत नाही. तो, ही गोष्ट समजूच शकत नाही की, रुपयावाचूनही काम उत्तम प्रकारे चालू शकते.

ज्याप्रमाणे व्यापाऱ्याला (केवळ धन प्राप्तीचाच उद्देश असल्याने) माल घेणे, माल देणे इत्यादी व्यापार संबंधी प्रत्येक क्रियेत धनच दिसत असते, त्याचप्रमाणे परमात्मप्राप्तीच्या जिज्ञासूला (एकमात्र परमात्मप्राप्तीचा उद्देश असल्याने) प्रत्येक वस्तू, क्रिया इत्यादीत तत्त्वरूपाने परमात्माच दिसत असतात. त्याला असा अनुभव येतो की, परमात्म्याशिवाय दुसरे कोणते तत्त्व नाहीच, असूच शकत नाही.

## मार्मिक गोष्ट

अर्जुनाने चौदाव्या अध्यायामध्ये गुणातीत होण्याचा उपाय विचारला होता. गुणांच्या संगानेच जीव संसारात फसत असतो. म्हणून गुणांचा संग समाप्त करण्यासाठी भगवंतांनी येथे आपल्या प्रभावाचे वर्णन केले आहे. लहानशा प्रभावाला समाप्त करण्यासाठी मोठ्या प्रभावाची आवश्यकता असते. म्हणून जोपर्यंत जीवावर गुणांचा (संसाराचा)-

* वास्तविक रुपयांच्या संख्येच्या आधारावर स्वतःला लहान किंवा मोठे मानणे पतनाचे चिन्ह आहे. रुपयांची संख्या केवळ अभिमान वाढविण्या-शिवाय दुसऱ्या काही कामी येत नाही. अभिमान आसुरी संपत्तीचे मूळ आहे. जितके काही दुर्गुण-दुराचार, पापे आहेत सर्व अभिमानरूपी वृक्षाच्या सावलीत राहतात.

प्रभाव आहे तोपर्यंत भगवंताच्या प्रभावाला जाणून घेण्याची फार मोठी आवश्यकता आहे.

आपल्या प्रभावाचे वर्णन करताना भगवंतांनी (या अध्यायाच्या बाराव्यापासून पंधराव्या श्लोकापर्यंत) हे सांगितले की मीच संपूर्ण जगताला प्रकाशित करतो, मीच पृथ्वीत प्रवेश करून सर्व प्राण्यांना धारण करतो, मीच पृथ्वीतून अन्न उत्पन्न करून सर्व प्राण्यांना पुष्ट करतो. जेव्हा मनुष्य त्या अन्नाचे सेवन करतो तेव्हा मीच वैश्वानर रूपाने त्या अन्नाला पचवीत असतो आणि मनुष्यामध्ये स्मृती, ज्ञान व अपोहनही मीच करतो. या वर्णनाहून सिद्ध होते की, समष्टीपासून व्यष्टीपर्यंतच्या संपूर्ण क्रिया आदीपासून अंतापर्यंत भगवंताच्या अंतर्गत त्यांच्या शक्तीने होत आहेत. मनुष्य अहंकाराने त्या क्रियांचा कर्ता स्वत:ला समजतो अर्थात् त्या क्रियांना व्यक्तिगत मानतो आणि बांधला जातो.

**परिशिष्ट भाव**—या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात भगवंताने जी गोष्ट सांगितली होती, त्याचा उपसंहार या श्लोकात करतात.

पूर्वीच्या तीन श्लोकात भगवंताने प्रभाव आणि क्रियारूपाने आपल्या विभूतींचे वर्णन केले आहे, परंतु प्रस्तुत श्लोकात स्वयं आपले वर्णन करतात. तात्पर्य असे आहे की, या श्लोकात स्वयं भगवंताचे वर्णन आहे, आदित्यगत, चंद्रमागत, अग्निगत अथवा वैश्वानरगत भगवंताचे वर्णन नाही. मूळात एकच तत्त्व आहे, केवळ वर्णनात फरक आहे.

पूर्वी '**ममैवांशो जीवलोके**' पदांनी हे सिद्ध झाले की, भगवन् 'आपले' आहेत आणि येथे '**सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टः**' पदांनी असे सिद्ध होते की, भगवान् 'आपल्यात' आहेत. भगवंताला 'आपले' स्वीकार करण्यामुळे त्यांच्यात स्वाभाविक प्रेम राहील आणि 'आपल्यात' स्वीकार करण्याने त्यांना प्राप्त करण्यासाठी दुसऱ्या ठिकाणी जाण्याची जरूरी नाही.

'अपोहनम्' पदाचा अर्थ आहे—'**अपगत ओहनम्**' अर्थात् संशयाचे निवारण. 'वेदान्ता'चा अर्थ आहे—वेदांचा अंत अर्थात् निष्कर्ष, सार—'**उभयोरपि दृष्टोऽन्तः**' (गीता २। १६).

भगवान् म्हणतात की, वेद अनेक आहेत, परंतु त्या सर्वात जाणण्यायोग्य मी एकच आहे आणि त्या सर्वांना जाणणाराही मीच आहे. तात्पर्य हे आहे की, सर्व काही मीच आहे.

*संबंध—भगवंतांनी याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकापासून पंधराव्या श्लोकापर्यंत (तीन प्रकरणात) क्रमाने संसार, जीवात्मा आणि परमात्म्याचे विस्ताराने वर्णन केले. आता त्या विषयाचा उपसंहार करताना पुढील दोन श्लोकांत त्या तिन्हींचे क्रमाने क्षर, अक्षर आणि पुरुषोत्तम नावाने स्पष्ट वर्णन करीत आहेत.*

## द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च।
## क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते॥ १६॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **लोके** | = या संसारात | **इमौ** | = हे | **क्षरः** | = क्षर |
| **क्षरः** | = क्षर (नाशवान्) | **द्वौ, एव** | = दोन प्रकारचेच | **च** | = आणि |
| **च** | = आणि | **पुरुषौ** | = पुरुष आहेत. | **कूटस्थः** | = जीवात्मा |
| **अक्षरः** | = अक्षर | **सर्वाणि** | = संपूर्ण | **अक्षरः** | = अक्षर |
| | (अविनाशी)— | **भूतानि** | = प्राण्यांची शरीरे | **उच्यते** | = म्हटला जातो. |

*व्याख्या*—**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च**—येथे "**लोके**" पदाला संपूर्ण संसाराचे वाचक समजावे. याच अध्यायाच्या सातव्या श्लोकात "**जीवलोके**" पदही याच अर्थाने आले आहे.

या जगतात दोन विभाग लक्षात येतात. शरीरादी नाशवान् पदार्थ (जड) आणि अविनाशी जीवात्मा (चेतन). विचार केल्यास असे स्पष्ट प्रतीत होते की, एक तर प्रत्यक्ष दिसणारे शरीर आहे आणि दुसरा त्यात राहणारा जीवात्मा आहे. जीवात्म्याच्या अस्तित्वानेच प्राण कार्य करीत असतात आणि शरीराचे संचालन होत असते. जीवात्म्याबरोबर प्राण निघून जाताच शरीराचे संचालन बंद होते आणि शरीर सडू लागते. लोक त्या शरीराला जाळतात. कारण महत्त्व नाशवान शरीराचे नाही, तर त्यात राहणाऱ्या अविनाशी जीवात्म्याचे आहे.

पंचमहाभूतापासून (आकाश, वायू, अग्नी, जल आणि पृथ्वी) बनलेले शरीरादी जेवढे पदार्थ आहेत, ते सर्व जड आणि नाशवान् आहेत. प्राण्यांची (प्रत्यक्ष दिसणारी) स्थूलशरीरे स्थूल समष्टी जगताशी एक आहेत, दहा इंद्रिये, पाच प्राण, मन आणि बुद्धी या सतरा तत्त्वांनी युक्त असलेले सूक्ष्मशरीर, सूक्ष्म समष्टी जगताशी एक आहे आणि कारण-

शरीर (स्वभाव, कर्मसंस्कार, अज्ञान) कारण समष्टी जगताशी (मूळ प्रकृती) एक आहे. हे सर्व क्षरणशील (नाशवान्) असल्याकारणाने ''क्षर'' नावाने संबोधले गेले आहेत.

वास्तविक ''व्यष्टी'' नावाची कोणती वस्तू नाहीच, केवळ समष्टी संसाराच्या थोड्या अंशाला आपली मानल्यामुळे त्याला व्यष्टी म्हणतात. शरीरादी वस्तूंची संसाराशी भिन्नता केवळ (आसक्ती, ममता असल्याकारणाने) मानलेली आहे, वास्तविक नाही. सर्व पदार्थ आणि क्रिया प्रकृतीच्याच आहेत.* म्हणून स्थूल, सूक्ष्म आणि कारण शरीराच्या समस्त क्रिया क्रमाने स्थूल, सूक्ष्म आणि कारण समष्टी-संसाराच्या हितासाठीच करावयाच्या आहेत, आपल्यासाठी नव्हे.

ज्या तत्त्वाचा कधी विनाश होत नाही आणि जो सदा निर्विकार राहतो त्या जीवात्म्याचा वाचक येथे ''अक्षर'' पद आहे.† प्रकृती जड आहे आणि जीवात्मा (चेतन परमात्म्याचा अंश असल्याकारणाने) चेतन आहे. याच अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात भगवंतांनी ज्याला छेदन करण्यासाठी सांगितले होते, त्या संसाराला ''**क्षरः**'' पदाने आणि सातव्या श्लोकात भगवंतांनी ज्याला आपला अंश म्हटले होते, त्या जीवात्म्याला येथे ''**अक्षरः**'' पदाने सांगितले आहे. येथे आलेले क्षर, अक्षर आणि पुरुषोत्तम—हे तिन्हीही शब्द गीतेमध्ये तिन्हीही लिंगात आले आहेत.‡ यावरुन हे समजते की प्रकृती, जीवात्मा आणि परमात्मा स्त्रीही नाहीत, पुरुषही नाहीत आणि नपुंसकही नाहीत. वास्तविक लिंग हेसुद्धा शब्दाच्या दृष्टीने आहे, तत्त्वाला कोणतेही लिंग नाही.

क्षर आणि अक्षर—दोन्हीपेक्षा उत्तम असलेल्या ''पुरुषोत्तम'' नावाच्या सिद्धीसाठी येथे भगवंतांनी क्षर आणि अक्षर दोन्हींना ''पुरुष'' नावाने म्हटले आहे.

**क्षरः सर्वाणि भूतानि**—या अध्यायाच्या आरंभी ज्या संसारवृक्षाचे स्वरूप सांगून त्याचे छेदन करण्याची प्रेरणा केली गेली आहे, त्याच संसार-वृक्षाला येथे ''क्षर'' नावाने म्हटले गेले आहे.

येथे ''**भूतानि**'' पद प्राण्यांच्या स्थूल, सूक्ष्म आणि कारणशरीरांचेच वाचक समजले पाहिजे. कारण येथे भूतांना नाशवान् म्हटले गेले आहे. प्राण्यांची शरीरेच नाशवान् असतात, प्राणी स्वतः नव्हे. म्हणून ''**भूतानि**'' पद जड शरीरासाठीच आले आहे.

**कूटस्थोऽक्षर उच्यते**—याच अध्यायाच्या सातव्या श्लोकात भगवंतांनी ज्याला आपला सनातन अंश म्हटले आहे, त्याच जीवात्म्याला येथे ''अक्षर'' नावाने म्हटले गेले आहे.

जीवात्मा मग तो कितीही शरीरे धारण करो, कोणत्याही लोकात जावो, त्यात कधी कोणता विकार उत्पन्न होत नाही, तो जसाच्या तसाच राहत असतो. (८।१९, १३।३१) म्हणून येथे त्याला ''कूटस्थ'' म्हटले गेले आहे.

गीतेमध्ये परमात्मा आणि जीवात्मा दोघांच्या स्वरूपाचे वर्णन प्रायः समानच आढळून येते. जसे परमात्म्याला (१२।३ मध्ये) ''कूटस्थ'' तसेच (८।४ मध्ये) ''अक्षर'' म्हटले गेले आहे, त्याचप्रमाणे येथे (१५।१६ मध्ये) जीवात्म्यालाही ''कूटस्थ'' आणि ''अक्षर'' म्हटले गेले आहे. जीवात्मा आणि परमात्मा दोघातही परस्पर तात्त्विक आणि स्वरूपगत एकता आहे.

स्वरूपाने जीवात्मा सदा-सर्वदा निर्विकारच आहे, परंतु अज्ञानाने प्रकृती आणि तिचे कार्य शरीरादीशी आपली एकता मानून घेतल्याने तिची ''जीव'' संज्ञा होते, नाहीतर (अद्वैत-सिद्धांतानुसार) ते साक्षात् परमात्मतत्त्वच आहे.

* पदार्थ आणि क्रियांना संसाराच्या मानणे हा ''कर्मयोग'' आहे. प्रकृतीच्या मानणे ''ज्ञानयोग'' आणि भगवंताच्या मानणे ''भक्तियोग'' आहे. यांना वाटेल त्याचे माना परंतु हे आपले नाहीत—हे तर मानावेच लागेल.

† गीतेमध्ये क्षर, अक्षर आणि पुरुषोत्तम या तिन्हींचेही एकाच वेळी वर्णन निरनिराळ्या नावांनी अशा प्रकारे आले आहे—

| अध्याय व श्लोक | क्षर | अक्षर | पुरुषोत्तम |
|---|---|---|---|
| ७।४-६ | अपरा प्रकृती | परा प्रकृती | अहम् |
| ८।३-४ | आधिभूत, कर्म | आध्यात्म, आधिदैव | ब्रह्म, आधियज्ञ |
| १३।१-२ | क्षेत्र | क्षेत्रज्ञ | माम् |
| १४।३-४ | महद्ब्रह्म, योनी | गर्भ, बीज | अहम्, पिता |

‡ गीतेमध्ये क्षर, अक्षर व पुरुषोत्तम यांचे वर्णन एका वेळेस तिन्ही लिंगात दिसून येते. उदाहरणार्थ—

| नाव | | पुल्लिंग (अध्याय व श्लोक) | स्त्रीलिंग (अध्याय व श्लोक) | नपुंसकलिंग (अध्याय व श्लोक) |
|---|---|---|---|---|
| क्षर | - | क्षर (१५।१६) | अपरा (७।५) | महद्ब्रह्म (१४।३-४) |
| अक्षर | - | जीवभूतः (१५।७) | जीवभूताम् (७।५) | अध्यात्मम् (८।३) |
| पुरुषोत्तम | - | भर्ता (९।१८) | गतिः (९।१८) | शरणम् (९।१८) |

**परिशिष्ट भाव**—पूर्वी सहाव्या श्लोकात आणि नंतर बाराव्यापासून पंधराव्या श्लोकापर्यंत भगवंताने 'अलौकिक' तत्त्वाचे वर्णन केले की, स्वतंत्र सत्ता अलौकिकाचीच आहे, लौकिकाची नाही. लौकिकाची सत्ता अलौकिकामुळेच आहे. अलौलिकाद्वाराच लौकिक प्रकाशित होते. लौकिकात जो प्रभाव दिसून येतो, तो सर्व अलौकिकाचाच आहे. आता सोळाव्या श्लोकात भगवान् '**लोके**' शब्दाने 'लौकिक तत्त्व' याचे वर्णन करतात.

जगत् (क्षर) आणि जीव (अक्षर)—दोन्ही 'लौकिक' आहेत—'**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च**' आणि भगवान् या दोन्हीहून विलक्षण अर्थात् 'अलौकिक' आहेत—'**उत्तमः पुरुषस्त्वन्यः**' (गीता १५। १७). कर्मयोग आणि ज्ञानयोग—हे दोन योगमार्गही 'लौकिक' आहेत—'**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा........**' (गीता ३। ३). क्षराला अनुसरून कर्मयोग आणि अक्षराला अनुसरून ज्ञानयोग चालतो, परंतु भक्तियोग 'अलौकिक' आहे, जो भगवंताला अनुसरून चालतो. सातव्या अध्यायात वर्णन केलेल्या 'अपरा-प्रकृती'ला येथे 'क्षर' नावाने आणि 'परा-प्रकृती'ला येथे 'अक्षर' नावाने म्हटले गेले आहे.

## उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः।
## यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः॥ १७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **उत्तमः** | = उत्तम | **यः** | = जो | **अव्ययः** | = अविनाशी |
| **पुरुषः** | = पुरुष | **परमात्मा** | = 'परमात्मा'— | **ईश्वरः** | = ईश्वर |
| **तु** | = तर | **इति** | = या नावाने | **लोकत्रयम्** | = तिन्ही लोकांत |
| **अन्यः** | = दुसराच (विलक्षणच) आहे, | **उदाहृतः** | = म्हटला गेला आहे (तोच) | **आविश्य** | = आविष्टहोऊन (सर्वांचे) |
| | | | | **बिभर्ति** | = भरण-पोषण करतो. |

*व्याख्या*—**उत्तम पुरुषस्त्वन्यः**—पूर्व श्लोकात क्षर आणि अक्षर दोन प्रकारच्या पुरुषांचे वर्णन केल्यानंतर आता भगवान् त्या दोन्हीहून उत्तम पुरुष तर दुसराच आहे, असे सांगतात.*

येथे "**अन्यः**" पद परमात्म्याला, अविनाशी अक्षराहून (जीवात्मा) भिन्न दाखविण्यासाठी नव्हे, तर त्याहून विलक्षण असल्याचे सांगण्यासाठी आले आहे. म्हणूनच भगवंतांनी पुढे अठराव्या श्लोकात स्वतःला नाशवान् क्षरापेक्षा "अतीत" आणि अविनाशी अक्षरापेक्षा "उत्तम" म्हटले आहे. परमात्म्याचा अंश असूनही जीवात्म्याची दृष्टी अथवा आकर्षण नाशवान् क्षराकडेच होत आहे. म्हणूनच येथे भगवंतांना त्यापेक्षा विलक्षण दाखविले गेले आहे.

**परमात्मेत्युदाहृतः**—त्या उत्तम पुरुषालाच "परमात्मा" नावाने म्हटले जाते. "परमात्मा" शब्द निर्गुणाचा वाचक मानला जातो, ज्याचा अर्थ परम (श्रेष्ठ) आत्मा, अथवा संपूर्ण जीवांचा आत्मा असा होतो. या श्लोकात "परमात्मा" आणि "**ईश्वर**"-दोन्हीही शब्द आले आहेत, ज्याचे तात्पर्य निर्गुण आणि सगुण सर्व एक पुरुषोत्तमच आहे.

**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः**—तो उत्तम पुरुष (परमात्मा) तिन्ही लोकात अर्थात् सर्वत्र समानरूपाने नित्य व्याप्त आहे.

येथे "**बिभर्ति**" पदाचे तात्पर्य, वास्तविक परमात्माच संपूर्ण प्राण्यांचे भरण-पोषण करतात, परंतु जीवात्म्याने संसाराशी आपला संबंध जोडल्याकारणाने अज्ञानाने सांसारिक व्यक्ती इत्यादींना आपले मानून त्यांच्या भरण-पोषणादिकांचा भार आपल्यावर घेतला आहे. त्यामुळे तो व्यर्थच दुःख भोगतो.†

भगवंतांना "**अव्ययः**" म्हणण्याचे तात्पर्य, संपूर्ण

* द्वे अक्षरे ब्रह्मपरे त्वनन्ते विद्याविद्ये निहिते यत्र गूढे।
क्षरं त्वविद्या ह्यमृतं तु विद्या विद्याविद्ये ईशते यस्तु सोऽन्यः॥

(श्वेताश्वतरोपनिषद ५। १)

"ज्या ब्रह्मापेक्षाही श्रेष्ठ, लपलेले, असीम आणि परम अक्षर परमात्म्यात विद्या आणि अविद्या दोन्हीही स्थित आहेत, तेच ब्रह्म आहे. विनाशशील जड वर्ग तर अविद्या नावाने म्हटला गेला आहे आणि अविनाशी जीवात्मा विद्या नावाने म्हटला गेला आहे. जो ह्या विद्या आणि अविद्या दोन्हीवर शासन करतो तो परमेश्वर या दोन्हीहून सर्वथा भिन्न आणि विलक्षण आहे."

(२) क्षरं प्रधानममृताक्षरं हरः क्षरात्मानावीशते देव एकः। (श्वेताश्वतरोपनिषद १। १०)

"प्रकृती तर विनाशशील आहे आणि तिला भोगणारा जीवात्मा अमृतस्वरूप अविनाशी आहे. या दोन्हींना (क्षर व अक्षर यांना) एक ईश्वर आपल्या शासनात ठेवतो."

† भरण-पोषणाची गोष्ट भक्तिमार्गातच येते, ज्ञानमार्गात नव्हे. कारण भक्तिमार्गात जीव आणि परमात्मा यात भिन्नता मानली जाते. म्हणून ह्या प्रकरणाला भक्तीचेच मानले पाहिजे.

लोकांचे भरण-पोषण करत असूनही भगवंताचा काहीही व्यय ( खर्च ) होत नाही अर्थात् त्यांच्यात कोणत्याही प्रकारची किंचिन्मात्रही उणीव येत नाही. ते नेहमी जसेच्या तसेच राहतात.

**ईश्वरः**—शब्द सगुणाचा वाचक मानला जातो ज्याचा अर्थ शासन करणारा असा आहे.

## मार्मिक गोष्ट

जरी माता-पिता बालकाचे पालन-पोषण करत असतात, तरीपण बालकाला, माझे पालन-पोषण कोण करीत आहे, कसे करीत आहे आणि कशासाठी करीत आहे? याचे ज्ञान नसते. त्याचप्रमाणे जरी भगवान् संपूर्ण प्राण्यांचे पालन-पोषण करतात, तरीपण अज्ञानी मनुष्याला ( भगवंतावर दृष्टी नसल्या-कारणाने ) माझे पालन-पोषण कोण करीत आहे, हे कळत नाहीं. भगवंताचा शरणागत भक्तच, एक भगवंतच सर्वांचे सम्यक् प्रकाराने पालन-पोषण करीत आहेत, ही गोष्ट योग्य रीतीने जाणतो.

पालन-पोषण करण्यात भगवान् कोणाशीही पक्षपात (विषमता) करीत नाहीत. ते भक्त, अभक्त, पापी-पुण्यात्मा, आस्तिक, नास्तिक, इत्यादी सर्वांचे समान- रूपाने पालन-पोषण करतात.* ही गोष्ट प्रत्यक्ष पाहण्यात येते की, भगवानद्वारा रचित सृष्टीमध्ये सूर्य सर्वांना समानरूपाने प्रकाश देतो, पृथ्वी सर्वांना समानरूपाने धारण करते, वैश्वानर अग्नी सर्वांच्या अन्नाला समान- रूपाने पचवितो, वायू सर्वांना ( श्वास घेण्यासाठी ) समान- रूपाने प्राप्त होतो, अन्न-पाणी सर्वांना समानरूपाने तृप्त करतात, इत्यादी.

**परिशिष्ट भाव**—पुरुषोत्तमाला 'अन्य' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, क्षर आणि अक्षर तर लौकिक आहेत, परंतु पुरुषोत्तम दोन्हीहून विलक्षण अर्थात् अलौकिक आहेत. म्हणून परमात्मा विचाराचे विषय नाहीत, तर श्रद्धा-विश्वासाचे विषय आहेत. परमात्म्याचे असल्याने भक्त, संत महात्मा, वेद आणि शास्त्र हेच प्रमाण आहेत. 'अन्य' याचा खुलासा भगवंताने पुढील श्लोकात केला आहे.

**'यो लोकत्रयमाविश्य.........'**—या पदांत बाराव्यापासून पंधराव्या श्लोकापर्यंतचा भाव आलेला आहे. मनुष्याचे कर्तव्य तर मनुष्यलोकात आहे, परंतु भगवंताचे कर्तव्य तिन्ही लोकांत आहे. वास्तविक भगवंताचे आपले कोणते कर्तव्य नाही, तरीही ते केवळ जीवांच्या हितासाठी कर्तव्य करतात (गीता—तीसऱ्या अध्यायाचा बावीसावा, तेवीसावा आणि चोवीसावा श्लोक).

***संबंध**—पूर्व श्लोकात वर्णित उत्तम पुरुषाशी आपली एकता सांगून आता साकाररूपाने प्रगट झालेले भगवान् श्रीकृष्ण आपले अत्यंत गोपनीय रहस्य प्रगट करतात.*

**यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः।**
**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः॥ १८॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यस्मात्** | = कारण | **अक्षरात् अपि** | = अक्षराहूनही | **वेदे** | = वेदात |
| **अहम्** | = मी | **उत्तमः** | = उत्तम आहे, | **पुरुषोत्तमः** | = 'पुरुषोत्तम' (नावाने) |
| **क्षरम्** | = क्षराहून | **अतः** | = म्हणून | | |
| **अतीतः** | = अतीत आहे | **लोके** | = लोकात | **प्रथितः** | = प्रसिद्ध |
| **च** | = आणि | **च** | = आणि | **अस्मि** | = आहे |

*व्याख्या*— **यस्मात्क्षरमतीतोऽहम्**—या पदांत भगवंताचा हा भाव आहे की, क्षर (प्रकृती) प्रतिक्षण परिवर्तनशील आहे आणि मी नित्य-निरंतर निर्विकाररूपाने जसाच्या तसा राहणारा आहे. म्हणून मी क्षराहून संपूर्णपणे अतीत आहे.

शरीराच्या पलीकडे (व्यापक, श्रेष्ठ, प्रकाशक, सबल, सूक्ष्म) इंद्रिये आहेत, इंद्रियांच्या पलीकडे मन आहे आणि मनाच्या पलीकडे बुद्धी आहे (३।४२). अशा प्रकारे एका पलीकडे एक असूनही शरीर, इंद्रिये, मन आणि बुद्धी एकाच जातीचे, जड आहेत. परंतु परमात्मतत्त्व त्यांच्याही

---

* अयमुत्तमोऽयमधमो जात्या रूपेण सम्पदा वयसा। श्लाघ्योऽश्लाघ्यो वेत्थं न वेत्ति भगवाननुग्रहावसरे॥
अन्तःस्वभावभोक्ता ततोऽन्तरात्मा महामेघः। खदिरश्चम्पक इव वा प्रवर्षणं किं विचारयति॥

(प्रबोधसुधाकर २५२। २५३)

''कोणावर कृपा करताना भगवान् असा विचार करीत नाहीत की, हा जात, रूप, धन आणि वय ह्याने उत्तम आहे की अधम ? स्तुत्य आहे की निंद्य?'' हा अन्तरात्मारूपी महामेघ आन्तरिक भावांचाच भोक्ता आहे. मेघ वर्षाव करीत असताना, हा खदिर ( खैर) आहे अथवा चम्पक ( चंपा) आहे ह्या गोष्टीचा विचार करीतो का?

अत्यंत पलीकडे आहे, कारण ते जड नाही तर चेतन आहे.

**अक्षरादपि चोत्तमः—** जरी परमात्म्याचा अंश असल्यामुळे जीवात्म्याची (अक्षर) परमात्म्याशी तात्त्विक एकता आहे तरीपण येथे भगवान् स्वतःला जीवात्म्यापेक्षा उत्तम सांगतात. याची कारणे अशी आहेत—(१) परमात्म्याचा अंश असूनही जीवात्मा क्षराशी (जड-प्रकृती) आपला संबंध मानतो (१५।७) आणि प्रकृतीच्या गुणांनी मोहित होतो, परंतु परमात्मा (प्रकृतीच्या अतीत असल्याकारणाने) कधी मोहित होत नाहीत (७।१३). (२) परमात्मा प्रकृतीला आपल्या अधीन करून लोकात येतात, अवतार घेतात (४।६) परंतु जीवात्मा प्रकृतीला वश होऊन लोकात येतो (८।१९). (३) परमात्मा सदैव निर्लिप्त असतात (४।१४, ९।९) परंतु जीवात्म्याला निर्लिप्त होण्यासाठी साधन करावे लागते (४।१८, ७।१४)

भगवंतांनी स्वतःला क्षराहून "अतीत" आणि अक्षरापेक्षा "उत्तम" म्हटले यातून असा भाव प्रगट होतो की, क्षर आणि अक्षर या दोन्हीत भिन्नता आहे. जर त्या दोन्हीत भिन्नता नसती तर भगवान् स्वतःला त्या दोन्हीहूनही अतीत म्हटले असते, अथवा दोन्हीपेक्षाही उत्तम म्हटले असते. म्हणून हे सिद्ध होते की, जसे भगवान् क्षराहून अतीत आणि अक्षरापेक्षा उत्तम आहेत, तसेच अक्षरही क्षराहून अतीत आणि उत्तम आहे

**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः—** येथे "**लोके**" पदाचा अर्थ, पुराण, स्मृती, इत्यादी शास्त्रे, आहे. शास्त्रामध्ये भगवान् "पुरुषोत्तम" नावाने प्रसिद्ध आहेत.

शुद्ध ज्ञानाचे नाव "वेद" आहे, जो अनादी आहे. तेच ज्ञान आनुपूर्वीरूपाने ऋक्, यजुः इत्यादी वेदांच्या रूपाने प्रकट झाले आहे. वेदांतही भगवान् "पुरुषोत्तम" नावाने प्रसिद्ध आहेत.

पूर्व श्लोकात भगवंतांनी म्हटले होते की, क्षर आणि अक्षर—दोन्हीपेक्षा उत्तम पुरुष तर दुसराच आहे. तो उत्तम पुरुष कोण आहे—हे सांगत असताना भगवान् हे रहस्य प्रकट करतात की, तो उत्तम पुरुष—"**पुरुषोत्तम**" मीच आहे.

## विशेष गोष्ट

(१) संपूर्ण भौतिक सृष्टी "क्षर" (नाशवान्) आहे आणि परमात्म्याचा अंश जीवात्मा "अक्षर" (अविनाशी) आहे. क्षराहून अतीत आणि उत्तम असूनही अक्षराने क्षराशी आपला संबंध मानला—यापेक्षा दुसरा मोठा कोणताच दोष, चूक अथवा भ्रम नाहीच. क्षराशी हा संबंध केवळ मानलेला आहे, वास्तविक एक क्षणसुद्धा राहणारा नाही. जसे बाल्यावस्थेपासून आत्तापर्यंत शरीर पूर्णपणे बदलून गेले, तरीही आपण म्हणतो की, "मी तोच आहे". हेही आपण सांगू शकत नाहीत की, अमुक दिवशी बाल्यावस्था संपली आणि तारुण्यावस्था सुरू झाली. कारण नदीच्या प्रवाहाप्रमाणे शरीर निरंतरच बदलत राहते, परंतु अक्षर (जीवात्मा) नदीमध्ये असलेल्या शिलाखंडाप्रमाणे सदा अचल आणि असंग राहतो. जर अक्षरही क्षराप्रमाणे निरंतर परिवर्तनशील आणि नाशवान् असते तर त्याचे संकट समाप्त झाले असते. परंतु स्व (अक्षर) अपरिवर्तनशील आणि अविनाशी असूनही निरंतर परिवर्तनशील आणि नाशवान क्षराला पकडतो—त्याला आपले मानतो. घडते असे की, अक्षर क्षराला सोडत नाही आणि क्षर एक क्षणही थांबत नाही. हे संकट समाप्त करण्याचा सोपा उपाय असा आहे; क्षराला (शरीरादी) क्षराच्याच (संसार) सेवेमध्ये लावावे, त्याला संसाररूपी बगीच्याचे खत बनवावे.

मनुष्याला शरीरादी नाशवान पदार्थ अधिकार गाजविण्यासाठी अथवा आपले मानण्यासाठी मिळालेले नाहीत, तर सेवा करण्यासाठी मिळाले आहेत. या पदार्थांद्वारा दुसऱ्यांची सेवा करण्याचीच जबाबदारी मनुष्यावर आहे, आपले मानण्याचा मुळीच अधिकार नाही.

(२) पंधराव्या अध्यायात भगवंतांनी अगोदर क्षर-संसारवृक्षाचे वर्णन केले. मग त्याचे छेदन करून परम पुरुष परमात्म्याला शरण होण्याविषयी अर्थात् संसाराशी असलेला आपलेपणा हटवून केवळ एका परमात्म्याला आपले मानण्याची प्रेरणा केली. त्यानंतर अक्षर-जीवात्म्याला आपला सनातन अंश सांगून त्याच्या स्वरूपाचे वर्णन केले. शेवटी भगवंतांनी (बाराव्यापासून पंधराव्या श्लोकापर्यंत) आपल्या प्रभावाचे वर्णन करत असताना सांगितले की, सूर्य, चंद्र आणि अग्नीमध्ये माझेच तेज आहे, मीच पृथ्वीमध्ये प्रविष्ट होऊन आपल्या शक्तीने चराचर सर्व प्राण्यांना धारण करतो. मीच अमृतमय चंद्राच्यारूपाने संपूर्ण वनस्पतींना पुष्ट करतो. वैश्वानर अग्नीरूपाने मीच प्राण्यांच्या शरीरात स्थित होऊन त्यांच्याद्वारा खाल्लेल्या अन्नाला पचवितो. मीच सर्व प्राण्यांच्या हृदयामध्ये अंतर्यामीरूपाने विराजमान् आहे. माझ्यामुळेच स्मृती, ज्ञान आणि अपोहन (भ्रम, संशय इत्यादी दोषांचा नाश) होते. वेदादी सर्व शास्त्रांद्वारा मीच जाणण्याला योग्य आहे आणि वेदांच्या अंतिम सिद्धांताचा निर्णय करणारा तसेच वेदांना जाणणाराही मीच आहे. अशा प्रकारे आपला प्रभाव प्रकट केल्यानंतर या श्लोकात

भगवान् असे गुह्यतम रहस्य प्रगट करतात की, ज्याचा हा सर्व प्रभाव आहे तो (क्षराहून अतीत आणि अक्षरापेक्षा उत्तम) ''पुरुषोत्तम'' मीच (साक्षात् साकाररूपाने प्रगट श्रीकृष्ण) आहे आणि तुझ्यासमोर बसलो आहे.

भगवान् श्रीकृष्णांनी अर्जुनावर फार विशेष कृपा करूनच आपले रहस्य आपल्या मुखाने प्रकट केले आहे. (जसे एखादा पिता आपल्या पुत्रासमोर आपली गुप्त संपत्ती प्रगट करतो अथवा एखाद्या वाट चुकलेल्या माणसास कोणी सांगावे की, तू ज्याला शोधत आहेस, तो मीच आहे)

**परिशिष्ट भाव**—आपल्या अलौकिकतेकडे दृष्टी करविण्यासाठी येथे भगवंताने '**यस्मात्**' पद दिले आहे.

'**अक्षरादपि चोत्तमः**'—'अक्षर' शब्द जीवात्म्यासाठी ही येतो आणि ब्रह्मासाठीही—'**अक्षरं ब्रह्म परमम्**' (गीता ८।३). हा शब्द सर्व ठिकाणी चेतनाचा वाचकच येतो, जडाचा वाचक कुठेही येत नाही.

क्षर आणि अक्षर यांची स्वतंत्र सत्ता नाही, परंतु परमात्म्याची स्वतंत्र सत्ता आहे. क्षर आणि अक्षर दोन्ही परमात्म्यातच राहतात. परंतु अक्षर अर्थात् जीव क्षराशी संबंध जोडून त्याच्या अधीन होतो—'**ययेदं धार्यते जगत्**' (गीता ७।५). परमात्मा स्वाभाविक असंग राहतात, ते क्षराच्या अधीन नसतात—'**यस्मात्क्षरमतीतोऽहम्**'. म्हणून परमात्मा अक्षराहूनही (जीवाहूनही) उत्तम आहेत. जर जीवाने जगताशी संबंध न जोडता त्याच्या स्वामी असलेल्या परमात्म्याशी संबंध जोडला तर तो परमात्म्याशी अभिन्न (आत्मीय) होऊन जाईल—'**ज्ञानी त्वात्मैव मे मतम्**' (गीता ७।१८).

मुक्तीत तर अक्षरात (स्वरूपात) स्थिती होते, परंतु भक्तीत अक्षराहूनही उत्तम असलेल्या पुरुषोत्तमाची प्राप्ती होते. स्वरूप अंश आहे आणि पुरुषोत्तम अंशी आहे.

***संबंध**—चौदाव्या अध्यायाच्या सव्वीसाव्या श्लोकात भगवंतांनी ज्या अव्यभिचारिणी भक्तीची गोष्ट सांगितली होती आणि ज्याला प्राप्त करविण्यासाठी या पंधराव्या अध्यायात संसार, जीव आणि परमात्मा यांचे विस्तृत विवेचन केले गेले त्याचा आता पुढील श्लोकात उपसंहार करीत आहेत.*

## यो मामेवमसम्मूढो जानाति पुरुषोत्तमम्।
## स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत॥ १९॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भारत** | = हे भरतवंशी अर्जुन! | **माम्** | = मला | **सर्ववित्** | = सर्वज्ञ |
| **एवम्** | = अशाप्रकारे | **पुरुषोत्तमम्** | = पुरुषोत्तम | **सर्वभावेन** | = सर्वप्रकारे |
| **यः** | = जो | **जानाति** | = जाणतो, | **माम्** | = माझेच |
| **असम्मूढः** | = मोहरहित मनुष्य | **सः** | = तो | **भजति** | = भजन करतो. |

*व्याख्या*—**योमामेवमसम्मूढः**—जीवात्मा परमात्म्याचा सनातन अंश आहे. म्हणून आपल्या अंशी परमात्म्याच्या वास्तविक संबंधाचा (जो नित्य आहे) अनुभव करणे हेच त्याचे असम्मूढ (मोहरहित) होणे आहे.

संसार अथवा परमात्मा यांना तत्त्वाने जाणण्यात मोहच (मूढता) बाधक आहे. कोणत्याही वस्तूच्या वास्तविकतेचे ज्ञान, जेव्हा त्या वस्तूशी राग वा द्वेषपूर्वक मानला गेलेला कोणताही संबंध नसेल, तेव्हाच होऊ शकते. नाशवान् पदार्थांशी राग-द्वेषपूर्वक संबंध मानणे हाच मोह आहे.

संसाराला तत्त्वाने जाणताच परमात्म्याशी आपल्या अभिन्नतेचा अनुभव येतो आणि परमात्म्याला तत्त्वाने जाणताच संसाराशी आपल्या भिन्नतेचा अनुभव होतो. तात्पर्य, संसाराला तत्त्वाने जाणल्याने संसाराशी मानलेल्या संबंधाचा विच्छेद होतो आणि परमात्म्याला तत्त्वाने जाणल्याने परमात्म्याशी असलेल्या वास्तविक संबंधाचा अनुभव येतो.

संसाराशी आपला संबंध मानणे हाच भक्तीमध्ये व्यभिचारदोष आहे. या व्यभिचारदोषापासून सर्वथा रहित होण्यातच उपर्युक्त पदांचा भाव समजावा.

**जानाति पुरुषोत्तमम्**—ज्याची मूढता संपूर्णपणे नष्ट झालेली आहे, तोच मनुष्य भगवंताला ''पुरुषोत्तम'' जाणतो.

क्षराहून सर्वथा अतीत असलेल्या पुरुषोत्तमालाच (परम पुरुष परमात्मा) सर्वोपरी मानून त्याच्या सम्मुख होणे, केवळ त्यांनाच आपले मानणे हे भगवंताना यथार्थरूपाने ''पुरुषोत्तम'' जाणणे आहे.

संसारात जो काही प्रभाव पाहण्या-ऐकण्यात येतो तो सर्व एका भगवंताचाच (पुरुषोत्तमाचा) आहे असे मानल्याने संसाराचे आकर्षण संपूर्णपणे समाप्त होते. जर संसाराचे थोडे-ही आकर्षण राहिले तर असे समजावे की, अजून भगवंतांना दृढतेने मानले नाही.

**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत**—जो भगवंतांना

''पुरुषोत्तम'' जाणतो आणि या विषयात ज्याच्या अंत:करणात कोणता विकल्प, भ्रम अथवा संशय राहत नाही, त्या मनुष्याला जाणण्यासारखे काही राहत नाही. म्हणून त्याला भगवान् ''सर्ववित्'' म्हणतात.*

भगवंताला जाणणारी व्यक्ती कितीही कमी शिक्षित असो, ती सर्व काही जाणणारी आहे, कारण तिने जाणण्यायोग्य तत्त्वाला जाणून घेतले आहे, तिला आणखी काहीही जाणणे बाकी राहिले नाही.

जो मनुष्य भगवंताला ''पुरुषोत्तम'' जाणतो त्या ''सर्ववित्'' माणसाची ओळख ही आहे की, तो सर्व प्रकारे सहज भगवंताचेच भजन करतो

जेव्हा मनुष्य भगवंतांना ''क्षराहून अतीत'' जाणतो तेव्हा त्याचे मन (राग) क्षरापासून (संसार) हटून भगवंतात लागते आणि जेव्हा तो भगवंतांना ''अक्षरापेक्षा उत्तम'' जाणतो तेव्हा त्याची बुद्धी (श्रद्धा) भगवंतात लागते.† मग त्याच्या प्रत्येक वृत्तीने आणि क्रियेने आपोआप भगवंताचे भजन होते. अशा प्रकारे सर्व प्रकाराने भगवंताचे भजन करणे हीच ''अव्यभिचारिणी भक्ती'' आहे.

शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी सांसारिक पदार्थांशी जोपर्यंत मनुष्य आसक्तिपूर्वक आपला संबंध मानतो, तोपर्यंत तो सर्व प्रकारे भगवंताचे भजन करू शकत नाही. कारण जेथे आसक्ती आहे, तेथे वृत्ती आपोआप जात असते.

''मी भगवंताचा आहे आणि भगवंतच माझे आहेत''- या वास्तविकतेला दृढतेने मानल्याने आपोआप सर्व प्रकारे भगवंताचे भजन होते. मग भक्ताच्या संपूर्ण क्रिया (झोपणे, जागणे, बोलणे, चालणे, खाणे, पिणे इत्यादी) भगवंताच्या प्रसन्नतेसाठीच होतात, आपल्यासाठी नव्हे.

ज्ञानमार्गात ''जाणणे'' आणि भक्तिमार्गात ''मानणे'' मुख्य असते. ज्या विषयात किंचित्मात्रही संशय नाही, त्याला दृढतापूर्वक ''मानणे'' हेच भक्तिमार्गात ''जाणणे'' आहे. भगवंताला सर्वोपरी मानल्यानंतर भक्त सर्व प्रकाराने भगवंताचेच भजन करतो (१०।८).

भगवंताला ''पुरुषोत्तम'' (सर्वोपरी) मानल्यानेसुद्धा जर मनुष्य ''सर्ववित्'' होतो, तर मग सर्व प्रकाराने भगवंताचे भजन करीत असताना भगवंताना ''पुरुषोत्तम'' म्हणून जाणेल—यात काय आश्चर्य ?

**परिशिष्ट भाव—'यो मामेवमसम्मूढो जानाति पुरुषोत्तमम्'**—जो भगवंताना जाणतो, तोच वास्तविक 'असम्मूढ' आहे (गीता—दहाव्या अध्यायाचा तीसरा श्लोक). परंतु जो भगवंताना जाणत नाही तो 'मूढ' आहे—**'अवजानन्ति मां मूढाः'** (गीता ९। ११).

**'स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत'**—क्षर आणि अक्षर दोन्हीही समग्र भगवंताचे अंग आहेत. म्हणून यांना जाणणारा मनुष्य सर्ववित् (सर्वज्ञ) होत नाही. जो क्षराहून अतीत आणि अक्षराहून उत्तम असलेल्या पुरुषोत्तमाला जाणतो तोच मनुष्य 'सर्ववित्' अर्थात् समग्राला जाणणारा आहे. असा सर्ववित् भक्त सर्व प्रकारे भगवंतातच लागून राहतो—**'सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते'** (गीता ६। ३१). कारण त्याच्या दृष्टीत एका भगवंताशिवाय दुसरा कोणी नसतोच.

गीतेत 'सर्ववित्' शब्द केवळ भक्तासाठीच आला आहे. भक्त समग्राला अर्थात् लौकिक आणि अलौकिक दोन्हींना जाणतो, म्हणून तो सर्ववित् असतो. लौकिकाच्या अंतर्गत अलौकिक येऊ शकत नाही, परंतु अलौकिकाच्या अंतर्गत लौकिक ही येते. म्हणून निर्गुण तत्त्व (अक्षर) जाणणारा ब्रह्मज्ञानी सर्ववित् नसतो, तर समग्र भगवंताला जाणणारा भक्त सर्ववित् होतो.

***संबंध***—*अरुन्धती-दर्शन-न्यायानुसार (स्थूलाकडून क्रमाने सूक्ष्माकडे जाणे) भगवंतांनी या अध्यायामध्ये अगोदर ''क्षर'' आणि मग ''अक्षरा'' चे विवेचन केल्यानंतर शेवटी ''पुरुषोत्तमा'' चे वर्णन केले. आपल्या पुरुषोत्तमत्वाला सिद्ध केले. असे वर्णन करण्याचे तात्पर्य आणि प्रयोजन काय आहे. हे भगवान् पुढील श्लोकात सांगत आहेत.*

**इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ।**
**एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत॥ २०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अनघ** | = हे निष्पाप अर्जुन! | **गुह्यतमम्** | = अत्यंत गोपनीय | **उक्तम्** | = सांगितले गेले आहे |
| **इति** | = अशाप्रकारे | **शास्त्रम्** | = शास्त्र | **भारत** | = हे भरतवंशी अर्जुन! |
| **इदम्** | = हे | **मया** | = माझ्याद्वारा | **एतत्** | = हे |

* तदक्षरं वेदयते यस्तु सोम्य स सर्वज्ञः सर्वमेवाविवेशेति॥ (प्रश्नोपनिषद् ४। ११)
हे सोम्य! त्या अविनाशी परमात्म्याला जो कोणी जाणतो तो सर्वज्ञ आहे. तो सर्वरूप परमेश्वरात प्रविष्ट होतो.

† एखाद्या विशेष महत्त्वपूर्ण विषयावर मन आसक्तिपूर्वक तसेच बुद्धी श्रद्धापूर्वक लागते.

**बुद्ध्वा** = जाणून (मनुष्य) **बुद्धिमान्** = ज्ञानवान् (ज्ञातज्ञातव्य) **च** = (तसेच प्राप्त प्राप्तव्य) आणि **कृतकृत्यः** = कृतकृत्य **स्यात्** = होतो.

***व्याख्या***— **''अनघ''**—अर्जुनाला निष्पाप यासाठी म्हटले गेले आहे की, ते दोषदृष्टीरहित (असूयारहित) होते. दोषदृष्टी करणे हे पाप आहे. यामुळे अंत:करण अशुद्ध होते. जो दोषदृष्टिरहित असतो तोच भक्तीला पात्र होतो.

गोपनीय गोष्ट दोषदृष्टिरहित मनुष्यालाच सांगितली जाते.* जर दोषदृष्टी ठेवणाऱ्या मनुष्याला गोपनीय गोष्ट सांगितली, तर त्या मनुष्यावर त्याचा उलटा परिणाम होतो, अर्थात् तो त्या गोपनीय गोष्टीचा उलटा अर्थ लावून सांगणाऱ्यात देखील दोष पाहू लागतो की, हा आत्मश्लाघी आहे, दुसऱ्यांना मोहित करण्यासाठी सांगत आहे इत्यादी. यामुळे दोषदृष्टी ठेवणाऱ्या मनुष्याची फार हानी होत असते.

दोषदृष्टी होण्यात मुख्य कारण अभिमान आहे. मनुष्या-मध्ये ज्या गोष्टीचा अभिमान असतो, त्या गोष्टीची त्याच्यात उणीव असते. त्या उणीवेला तो दुसऱ्यात पाहू लागतो. आपल्यात चांगुलपणाचा अभिमान असल्याने दुसऱ्यात वाईट-पणा दिसतो आणि दुसऱ्यात वाईटपणा पाहण्यानेच आपल्यात चांगुलपणाचा अभिमान होतो.

जर दोषदृष्टी ठेवणाऱ्या मनुष्यासमोर भगवंताने स्वत:ला सर्वोपरी ''पुरुषोत्तम'' असल्याचे सांगितले असते तर त्याला विश्वास वाटला नसता, उलट त्याने हा विचार केला असता की, भगवान् आत्मश्लाघी (आपल्याच मुखाने आपले मोठेपण सांगणारे) आहेत.

**''निज अग्यान राम पर धरहीं''**। (मानस ७।७३।५)

भगवंताविषयी दोषदृष्टी झाल्यास त्याची फार हानी होते. म्हणून भगवान् आणि संत दोषदृष्टी ठेवणाऱ्या अश्रद्धाळू मनुष्यासमोर गोपनीय गोष्टी प्रकट करीत नाहीत. (१८।६७). वास्तविक पाहिले तर दोषदृष्टी ठेवणाऱ्या मनुष्यासमोर गोपनीय (रहस्ययुक्त) गोष्टी मुखातून निघत-च नाहीत.

अर्जुनाला ''**अनघ**'' संबोधन देण्यातून हा भावही होऊ शकतो की, या अध्यायात भगवंतांनी जो परम गोपनीय प्रभाव सांगितला आहे, तो अर्जुनासारख्या दोषदृष्टिरहित सरळ व्यक्तीसमोरच प्रकट केला जाऊ शकतो.

**इति गुह्यतमं शास्त्रमिदम्**—चौदाव्या अध्यायाच्या सव्वीसाव्या श्लोकात अव्यभिचारिणी भक्ती सांगितल्यावर भगवंतांनी पंधराव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकापासून एकोणीसाव्या श्लोकापर्यंत ज्या (क्षर, अक्षर आणि पुरुषोत्तमाचे) विषयाचे वर्णन केले आहे, त्या विषयाची पूर्णता आणि उद्देशाचा निर्देश येथे **''इति इदम्''** पदाने केला गेला आहे.

या अध्यायात प्रथम भगवंतांनी क्षर (संसार) आणि अक्षर (जीवात्मा) यांचे वर्णन करून आपला अप्रतिम प्रभाव (बाराव्यापासून पंधराव्या श्लोकापर्यंत) प्रगट केला. मग भगवंतांनी ही गोपनीय गोष्ट प्रगट केली की, ज्याचा हा सर्व प्रभाव आहे तो (क्षराहून अतीत आणि अक्षरापेक्षा उत्तम) ''पुरुषोत्तम'' मीच आहे.

नाटकात काम करणाऱ्या पात्राप्रमाणे भगवान् या पृथ्वीवर मनुष्यरूप धारण करून अवतरित होतात आणि असे आचरण करतात की, अज्ञानी मनुष्य त्यांना जाणू शकत नाहीत. (७।२४) नाटकामध्ये आपला खरा परिचय दिला जात नाही, गुप्त ठेवला जातो. परंतु भगवंतांनी या अध्यायात (अठराव्या श्लोकात) आपला वास्तविक परिचय देऊन अत्यंत गोपनीय गोष्ट प्रगट केली की, मीच पुरुषोत्तम आहे. म्हणून या अध्यायाला ''गुह्यतम'' म्हटले गेले आहे.

''शास्त्र''मध्ये प्राय: संसार, जीवात्मा आणि परमात्म्याचे वर्णन येते. या तिन्हींचे वर्णन पंधराव्या अध्यायात झाले आहे, म्हणून या अध्यायाला ''शास्त्र'' ही म्हटले गेले आहे.

सर्व शास्त्रमयी गीतेमध्ये केवळ याच अध्यायाला ''शास्त्र'' ची उपाधी मिळाली आहे. यात पुरुषोत्तमाचे वर्णन मुख्य असल्याकारणाने या अध्यायाला ''गुह्यतम शास्त्र'' म्हटले गेले आहे. या गुह्यतम शास्त्रामध्ये भगवंतांनी आपल्या प्राप्तीच्या सहा उपायांचे वर्णन केले आहे—

(१) संसाराला तत्त्वाने जाणणे (श्लोक १)

(२) संसाराशी मानलेल्या संबंधाचा विच्छेद करून एका भगवंताला शरण होणे (श्लोक ४)

(३) आपल्यात स्थित असलेल्या परमात्मतत्त्वाला जाणणे (श्लोक ११)

(४) वेदाध्ययनद्वारा तत्त्वाला जाणणे (श्लोक १५)

(५) भगवंतांना पुरुषोत्तम जाणून सर्व प्रकाराने त्यांचे भजन करणे (श्लोक १९)

* नवव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकातही भगवंतांनी अर्जुनाला दोषदृष्टिरहित म्हणूनच गुह्यतम ज्ञान सांगण्याची प्रतिज्ञा केली होती—''इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे''. या पंधराव्या अध्यायात तर नवव्या अध्यायापेक्षाही अधिक गोपनीय विषय सांगितला गेला आहे. म्हणून येथे ''अनघ'' चे तात्पर्य ''अनसूया'' मानणे उचितच आहे.

(६) संपूर्ण अध्याय तत्त्वतः जाणणे (श्लोक २०)

ज्या अध्यायात भगवत्प्राप्तीचे असे सुगम उपाय सांगितले गेले आहेत त्याला "शास्त्र" म्हणणे उचितच आहे.

**मया उक्तम्**—या पदांनी भगवान् म्हणतात की, संपूर्ण भौतिक जगताचा प्रकाशक आणि अधिष्ठान, समस्त प्राण्यांच्या हृदयात स्थित असलेला, वेदाद्वारा जाणण्यायोग्य तसेच क्षर आणि अक्षर दोन्हीहून उत्तम साक्षात् मी पुरुषोत्तम ह्याच्या द्वाराच हे गुह्यतम शास्त्र अत्यंत कृपापूर्वक सांगितले गेले आहे. माझ्या विषयात जसा मी सांगू शकतो, तसा दुसरा कोणी सांगू शकत नाही. कारण दुसरा अगोदर (माझ्याच कृपाशक्तीने) मला जाणेल.* मग तो माझ्याविषयी काही सांगेल, परंतु माझ्यात अज्ञान नाहीच.

वास्तविक स्वतः भगवंताव्यतिरिक्त दुसरा कोणीही त्यांना पूर्णरूपाने जाणू शकत नाही (१०।२,१५), सहाव्या अध्यायाच्या एकोणचाळीसाव्या श्लोकात अर्जुनाने भगवंताला म्हटले होते की, आपल्याशिवाय दुसरा कोणीही माझ्या संशयाचे निराकरण करू शकत नाही. येथे भगवान् जणू हे म्हणत आहेत की, माझ्याद्वारा सांगितलेल्या विषयात कोणत्याही प्रकारचा संशय राहण्याची शक्यताच नाही.

**एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत**—संपूर्ण अध्यायात भगवंतांनी संसाराची जी वास्तविकता, जीवात्म्याचे स्वरूप आणि आपला अप्रतिम प्रभाव तसेच गुप्ततेचे वर्णन केले आहे, त्याचा (विशेषत्वाने एकोणीसाव्या श्लोकाचा) निर्देश येथे "**एतत्**" पदाने केला गेला आहे. या गुह्यतम शास्त्राला जो मनुष्य तत्त्वाने जाणतो, तो ज्ञानवान् अर्थात् ज्ञात-ज्ञातव्य होतो. त्याला काहीही जाणणे शिल्लक राहत नाही, कारण त्याने जाणण्यायोग्य पुरुषोत्तमाला जाणले आहे.

परमात्मतत्त्वाला जाणल्याने मनुष्याची मूढता नष्ट होते. परमात्मतत्त्वाला जाणल्याशिवाय इतर लौकिक संपूर्ण विद्या, भाषा, कला इत्यादी कितीही जाणल्या तरी, त्यापासून मूढता समाप्त होत नाही, कारण लौकिक सर्व विद्या आरंभ आणि अंत होणाऱ्या तसेच अपूर्ण आहेत. जितक्या काही लौकिक विद्या आहेत, सर्व परमात्म्यापासूनच प्रकट होणाऱ्या आहेत. म्हणून त्या परमात्म्याला कशा प्रकाशित करू शकतील ? या सर्व लौकिक विद्यांना न जाणता ज्याने परमात्म्याला जाणले आहे, तोच वास्तविक ज्ञानवान् आहे.

एकोणीसाव्या श्लोकात सर्व प्रकारे भजन करणाऱ्या ज्या मोहरहित भक्ताला "**सर्ववित्**" म्हटले गेले आहे, त्याला च येथे "**बुद्धिवान्**" नावाने म्हटले गेले आहे.

येथे "च" पदात पूर्व श्लोकात आलेल्या गोष्टीच्या फलाचे (प्राप्त-प्राप्तव्यता) अनुकर्षण आहे. पूर्व श्लोकात सर्वभावाने भगवंताचे भजन करणे अर्थात् अव्यभिचारिणी भक्तीचा विषय विशेषत्वाने आला आहे. भक्तीसारखा दुसरा कोणता लाभ नाही—"**लाभु कि किछु हरि भगति समाना**" (मानस ७।११२।४). म्हणून ज्याने भक्ती प्राप्त करून घेतली, तो प्राप्त-प्राप्तव्य होतो, अर्थात् त्याला काहीही प्राप्त करणे बाकी राहत नाही.

भगवत्तत्त्वाची ही विलक्षणता आहे की, कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोग—तिन्हीपैकी कोण्याही एकाच्या सिद्धीने कृतकृत्यता, ज्ञातज्ञातव्यता आणि प्राप्तप्राप्तव्यता—तिन्हींची प्राप्ती होते. म्हणून जो भगवत्तत्त्वाला जाणतो, त्याला मग काहीही जाणणे, प्राप्त करणे आणि करणे बाकी राहत नाही. त्याचे मनुष्यजीवन सफल होते.

**परिशिष्ट भाव**—भगवंताने या अध्यायात आपण-आपल्याला पुरुषोत्तमरूपाने अर्थात् अलौकिक समग्ररूपाने प्रकट केले आहे. म्हणून याला 'गुह्यतम शास्त्र' म्हटले गेले आहे.

मनुष्य कर्मयोगाने कृतकृत्य, ज्ञानयोगाने ज्ञातज्ञातव्य आणि भक्तियोगाने प्राप्त-प्राप्तव्य होतो. मला आपल्यासाठी काही करायचे नाही—असा अनुभव झाल्याने मनुष्य कृतकृत्य होतो. शरीर माझे नाही, शरीरावर माझा अधिकार नाही आणि शरीराशी माझा संबंध नाही—असा अनुभव झाल्यास मनुष्य ज्ञातज्ञातव्य होतो. मला काही नको—असा अनुभव झाल्यास मनुष्य प्राप्त प्राप्तव्य होतो. या श्लोकात आलेल्या '**बुद्धिमान्**' पदात ज्ञातज्ञातव्य होण्याचा भाव आला आहे. पूर्व श्लोकात '**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत**' पदांत प्राप्तप्राप्तव्य होण्याचा भाव आला आहे. प्रस्तुत श्लोकात आलेल्या 'च' पदानेही अनुक्त समुच्चय अर्थ—प्राप्तप्राप्तव्य घेऊ शकतो. लौकिक क्षर आणि अक्षर तर प्राप्त आहेत, म्हणून अलौकिक परमात्माच प्राप्तव्य आहेत. या श्लोकातून हा भाव निघतो की, भक्ताला ज्ञानयोग आणि कर्मयोग—दोन्हीचे फल प्राप्त होते अर्थात् तो ज्ञातज्ञातव्य आणि कृतकृत्यही होतो (गीता—सातव्या अध्यायाचा एकोणतीसावा तीसावा आणि दहाव्या अध्यायाचा दहावा-अकरावा श्लोक).

* सोइ जानइ जेहि देहु जनाई। जानत तुम्हहि तुम्हइ होइ जाई॥ तुम्हरिहि कृपाँ तुम्हहि रघुनंदन। जानहिं भगत भगत उर चंदन॥

(मानस २।१२७।२)

*ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे पुरुषोत्तमयोगो नाम पञ्चदशोऽध्यायः ॥ १५ ॥*

**अशा प्रकारे ॐ तत्-सत् या भगवन्नामाच्या उच्चारणपूर्वक ब्रह्मविद्या आणि योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीतोपनिषद्रूपी श्रीकृष्णार्जुनसंवादात "पुरुषोत्तमयोग" नावाचा पंधरावा अध्याय समाप्त झाला ॥ १५ ॥**

या अध्यायात सांगितलेल्या विषयाला यथार्थरूपाने समजून घेतल्यावर पुरुषोत्तमा (भगवंता) शी नित्ययोगाचा अनुभव होतो. म्हणून या अध्यायाचे नाव "पुरुषोत्तमयोग" ठेवले गेले आहे.

### पंधराव्या अध्यायाची पदे, अक्षरे आणि उवाच

(१) या अध्यायात "**अथ पञ्चदशोऽध्यायः**" ची तीन, "**श्रीभगवानुवाच**" ची दोन, श्लोकांची दोनशे अठ्ठ्यांशी आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण पदांचा योग तीनशे सहा आहे.

(२) "**अथ पञ्चदशोऽध्यायः**" ची आठ, "**श्री भगवानुवाच**" ची सात, श्लोकांची सातशे एक आणि पुष्पिकेची सेहेचाळीस अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग सातशे बासष्ट आहे. या अध्यायाच्या वीस श्लोकांपैकी दुसरा, चौथा, पाचवा आणि पंधरावा हे चार श्लोक चव्वेचाळीस अक्षरांचे आणि तद्धसरा श्लोक पंचेचाळीस अक्षरांचा आहे. बाकीचे पंधरा श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायात एक उवाच आहे "**श्रीभगवानुवाच**".

### पंधराव्या अध्यायात प्रयुक्त छंद

या अध्यायाच्या वीस श्लोकांपैकी दुसरा, तीसरा आणि चौथा—हे तीन श्लोक "**उपजाति**" छन्दाचे आणि पाचवा तसेच पंधरावा हे दोन श्लोक "**इन्द्रवज्रा**" छन्दाचे आहेत. बाकी राहिलेल्या पंधरा श्लोकांपैकी सातव्या श्लोकाच्या प्रथम आणि तृतीय चरणात "रगण" प्रयुक्त असल्याने "**जाति-पक्षविपुला**", नवव्या श्लोकाच्या प्रथम चरणात तसेच वीसाव्या श्लोकाच्या तृतीय चरणात "रगण" प्रयुक्त असल्याने "**र-विपुला**", अठराव्या श्लोकाच्या तृतीय चरणात "मगण" प्रयुक्त असल्याने "**म-विपुला**" आणि एकोणीसाव्या श्लोकाच्या तृतीय चरणात "नगण" प्रयुक्त असल्याने "**न-विपुला**" संज्ञा असणारे छन्द आहेत. बाकीचे दहा (१,६,८,१० ते १४, १६ ते १७) श्लोक ठीक "**पथ्यावक्त्र**" अनुष्टुप् छन्दाच्या लक्षणांनी युक्त आहेत.

## पंधराव्या अध्यायाचा सार

भगवंताने सातव्या अध्यायात आपल्या दोन प्रकृतींचे वर्णन केले होते—अपरा आणि परा (७।४-५). पृथ्वी, जल, तेज, वायू, आकाश, मन, बुद्धी आणि अहंकार—ही आठ प्रकारची भेद असणारी 'अपरा-प्रकृती' आहे आणि जिने जगताला धारण केले आहे, ती जीवरूप बनलेली 'परा-प्रकृती' आहे. अपरा आणि परा—दोन्ही ईश्वराच्या प्रकृती अर्थात् स्वभाव आहेत. अपरा, परा आणि ईश्वर—या तिन्हीचे विस्ताराने वर्णन भगवान् पंधराव्या अध्यायात करतात. पंधराव्या अध्यायात प्रथम संसार-वृक्षाच्या रूपात 'अपरा' चे वर्णन करतात. नंतर सातव्यापासून अकराव्या श्लोकापर्यंत आपल्या अंशरूपाने असलेल्या 'परा' चे वर्णन करतात. त्यानंतर बाराव्यापासून पंधराव्या श्लोकापर्यंत आपल्या प्रभावाचे वर्णन करतात. शेवटी अपरा, परा आणि ईश्वर—तिन्हींचे क्षर, अक्षर आणि पुरुषोत्तम नावाने वर्णन करून अध्यायाचा उपसंहार करतात.

सातव्या अध्यायात तर भगवंताने अपरा आणि परा—दोन्हींना आपली प्रकृती अर्थात् आपल्याशी अभिन्न सांगितले आहे—'**इतीयं मे**' (७।४), '**मे पराम्**' (७।५). परंतु पंधराव्या अध्यायाच्या अठराव्या श्लोकात स्वतःला अपराहून (क्षराहून) अतीत आणि परापेक्षा (अक्षरापेक्षा) उत्तम म्हटले आहे. याचे तात्पर्य असे आहे की, जोपर्यंत साधक अपरा (संसार) आणि परा (स्वयं)—दोन्हींची स्वतंत्र सत्ता मानतो तोपर्यंत भगवान् अपराहून अतीत आणि पराहून उत्तम आहेत. परंतु जेव्हा त्याच्या मान्यतेत अपरा आणि परा यांची स्वतंत्र सत्ता राहत नाही, तेव्हा अपरा, परा आणि भगवान्—तिन्ही एकच असतात—'**वासुदेवः सर्वम्**' (७। १९), '**सदसच्चाहम्**' (९। १९).

पंधराव्या अध्यायाच्या मध्यात अक्षराच्या (जीवात्म्याच्या) वर्णनाचे तात्पर्य हे आहे की, जीवाच्या एका बाजूला क्षर (संसार) आहे आणि दुसऱ्या बाजूला पुरुषोत्तम (परमात्मा) आहेत. जीवाचा संबंध परमात्म्याशी आहे—'**ममैवांशो**

**जीवलोके**'. कारण जसे परमात्मा चेतन, अविनाशी आणि अपरिवर्तनशील आहेत, तसेच जीवही चेतन, अविनाशी आणि अपरिवर्तनशील आहे. शरीराचा संबंध संसाराशी आहे—'**मनः षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि**'. कारण जसा संसार जड, नाशवान् आणि परिवर्तनशील आहे, तसेच शरीरही जड, नाशवान् आणि परिवर्तनशील आहे. जीवाला परमात्म्यापासून केव्हाही वेगळे करू शकत नाही आणि शरीराला संसारापासून केव्हाही वेगळे करू शकत नाही.

परमात्मा त्याला म्हणतात तो आत्ता असावा, सर्वात असावा, सर्वांचा असावा, सर्वसमर्थ असावा, परम दयाळू असावा आणि अद्वितीय असावा. आत्ता असल्यामुळे त्यांच्या प्राप्तीसाठी भविष्याची आशा करावी लागणार नाही. सर्वात असल्यामुळे तो आपल्यातही आहे. म्हणून त्याचा शोध घेण्यासाठी कुठे जावे लागणार नाही. सर्वांचा असल्यामुळे तो आपलाही आहे. म्हणून त्याच्याशी स्वाभाविक प्रेम होईल. सर्वसमर्थ असल्याने आपणाला भयभीत होण्याचे कारण राहणार नाही. परम दयाळू असल्याने आपणाला निराश होण्याचे काही कारण राहणार नाही. अद्वितीय असल्यामुळे अपणाला त्यांना ओळखण्याची, त्यांचे वर्णन करण्याची काहीही आवश्यकता राहणार नाही.

परमात्मप्राप्ती न होण्याचे कारण हे आहे की, आपण त्यांची सत्ता आणि महत्ता स्वीकार करीत नाही आणि त्यांना आपले मानीत नाही. जर आपण त्यांची सत्ता, महत्ता आणि आत्मीयता स्वीकार करू तर मग, ते आपणाला अप्राप्त वाटणार नाहीत. ते आपणाला स्वाभाविक आवडू लागतील. कारण परमात्म्याला आपले मानल्याशिवाय प्रेम-प्राप्तीचा दूसरा कोणताही उपाय नाहीच. प्रेम यज्ञ, दान, तप, तीर्थ, व्रत इत्यादी मोठ-मोठ्या पुण्य-कर्मांनी मिळत नाही, तर भगवंताला आपले मानल्याने मिळते. भगवंताने म्हटले आहे—'**ममैवांशो जीवलोके**' (१५। ७). याचे तात्पर्य असे आहे की, जीव केवळ माझाच (भगवंताचाच) अंश आहे, यात अन्य कशाचे मिश्रण नाही. यावरुन सिद्ध होते की, केवळ भगवंताचाच अंश असल्या कारणामुळे आपला संबंध केवळ भगवंताशीच आहे. जर आपण भगवंताचेच अंश आहोत, तरमग प्रकृतीचे कार्य असलेले शरीर आपले कसे होईल? म्हणून भगवान्‌च आपले आहेत, दुसरे कोणीही आपले नाही. भगवंताचेच अंश असल्यामुळे आपण भगवंतापासून वेगळे होऊ शकत नाही, त्यांना सोडू शकत नाही. सर्वसमर्थ भगवान्‌सुद्धा जीवापासून वेगळे होऊ शकत नाहीत, जीवाला सोडू शकत नाहीत. जर भगवान् सोडतील तर जीव एक नवीन भगवान् होईल अर्थात् भगवान् एक राहणार नाहीत, तर अनेक होतील, जे कधी संभवत नाही. ज्याला आपण सोडू शकत नाही, त्याच्या विषयात असा प्रश्नच होऊ शकत नाही, तो कसा आहे? म्हणून भगवान् कसे आहेत, काय आहेत असा विचार न करता त्यांच्याशी प्रेम करावे. जेव्हा मनुष्य संसाराशी आपला संबंध मानतो, तेव्हा तो बांधला जातो आणि जेव्हा परमात्म्याशी आपला संबंध मानतो, तेव्हा मुक्त होऊन भक्त होतो. मनुष्याकडून सर्वात मोठी चूक अशी होते की, जे शरीर संसाराचे आहे, त्याला आपले मानतो आणि जे वास्तविक आपले आहे, त्या परमात्म्याला विसरतो. जेव्हा साधक या सत्याचा स्वीकार करतो की, शरीर माझे नाही आणि माझ्यासाठीही नाही, तेव्हा त्याच्याद्वारा आपोआप संसाराची 'सेवा' होते. जेव्हा तो या सत्याचा स्वीकार करतो की, भगवान् माझे आहेत आणि माझ्यासाठी आहेत, तेव्हा त्याचे स्वाभाविक भगवंतात 'प्रेम' होते. मोबदल्यात साधकाला कशाचीही इच्छा नसावी. कारण संसाराची वस्तू संसाराला दिली तर आपले काय खर्च झाले? नवीन उद्योग काय झाला? प्रेमाच्या मोबदल्यातही त्याला कशाचीही इच्छा नसावी. कारण तो नेहमीसाठीच आपला आहे, त्याच्याशी असलेल्या प्रेमाहून श्रेष्ठ दुसरी कोणती वस्तू नाहीच, ज्याची त्याला आवश्यकता असावी. प्रभू माझ्यासाठी आहेत, म्हणून स्वत:ला त्यांना अर्पित करणे आहे, त्यांच्याकडून काही मागायचे नाही. त्यांच्याकडून काही इच्छिल्यास आपण त्यांच्यापासून वेगळे होऊ आणि स्वत:ला अर्पण केल्याने त्यांच्याशी अभिन्न होऊ.

सेवेने मुक्ती प्राप्त होते आणि प्रेमाने पराभक्ती प्राप्त होते. मुक्तीपासून निरपेक्ष जीवनाची आणि भक्तीपासून सरस जीवनाची प्राप्ती होते.

